






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

( हिंदुस्थान सरकारच्या १८६० च्या २१ व्या कायद्याप्रमाणे नोंदलेली )

# महाराष्ट्र — साहित्य — परिषद

## घटना

( दिनांक १०–६–६२ पर्यंतच्या वा. सा. सभांतून संमत झालेल्या दुरुस्त्या-पुरुत्यासह )

जानेवारी सन १९६४

म. सा. परिषद कार्यालय टिळक रस्ता, पुणें २

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद

# घटना

[ कोल्हापुरी ता. २८-१२-३२ च्या साधारण सभेने मंजूर केलेल्या व नागपुरास ता. २४-१२-३३ च्या वार्षिक साधारण सभेत दुरुस्ती झालेल्या परिषदेच्या घटनेची पुन्हा दुरुस्ती जळगावी ९-११-३६ या तारखेस वा. सा. सभेने केली. ही दुरुस्त केलेली घटना ता. १-१-३७ पासून अमलात आली. ता. ७-२-३७ च्या वि. सा. सभेत व ता. ७-४-३९ च्या वा. सा. सभेत काही दुरुस्त्या करण्यातं आल्या. नंतर धुळे येथे ता. २५-१२-४४ रोजी भरलेल्या वा. सा. सभेत घटनेतील सरनाम्यात दिलेले संमेलन-परिषद एकात्मचे ध्येय सिद्ध होण्याचा विचार करण्याची वेळ व परिस्थिती प्राप्त झाली आहे असा ठराव झाला. त्या ठरावान्वये परिषदेची ता. ३१-३-४५ रोजी वि. सा. सभा भरून संमेलन-परिषद एकात्मातासमिती घटनेत योग्य त्या दुरुस्त्या करण्यास नेमण्यात आली. त्या समितीने तयार केलेली घटना परिषदेच्या ता. २३-९-४५ च्या वि. सा. सभेत संमत करण्यात आली. पुढे बेळगाव येथे भरलेल्या परिषदेच्या सभेत वा. सा. घटनेमध्ये बदल करण्यासाठी एक समिती नेमली गेली. त्या समितीने केलेल्या शिफारशी परिषदेच्या ता. १२-१-४७ रोजी भरलेल्या वि. सा. सभेमध्ये विचारात घेण्यात आल्या. तदनंतर १-११-१९५३ पर्यंतच्या विशेष साधारण व वार्षिक सभांतून काही किरकोळ दुरुस्त्या-पुरत्या करण्यात आल्या. पुढें ता. २६-६-१९६० रोजीं पुणें येथें भरलेल्या परिषदेच्या वार्षिक साधारण सभेंत घटनेंत आणखी कांही दुरुस्त्या करण्यांत आल्या. त्यानंतर मराठी साहित्य महामंडळाची स्थापना होऊन परिषद ही या महामंडळाची एक घटक संस्था झाली, त्यामुळें आवश्यक झालेल्या बऱ्याच दुरुस्त्या दि. १०-६-१९६२ रोजी पुणें येथें भरलेल्या परिषदेच्या वार्षिक साधारण सभेंत मंजूर झाल्या. प्रस्तुतच्या दुरुस्त घटनेची अंमल बजावणी १ एप्रिल १९६३ पासून करण्यात आल्याचे १६ जून १९६३ च्या वार्षिक साधारण सभेंत प्रकट करण्यात आले. ]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाग्यज्ञे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद

# घटना

**१. नाव** – महाराष्ट्र साहित्य परिषद.

**२. उद्देश** – मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करणे, उपाय योजणे, व इतर रीतीने झटणे आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणे हे परिषदेचे प्रधान उद्देश आहेत.

**३. साधने** – वरील उद्देश साध्य होण्याकरिता व त्यांस अनुसरून खालील, तसेच इतर अवश्य व योग्य वाटतील त्या साधनांचा उपयोग करणे.

( अ ) परिषदेच्या क्षेत्रसीमेत मराठी साहित्य संमेलने आवश्यकतेप्रमाणे भरविणे व भरविण्यास प्रोत्साहन देणे.

( आ ) ठिकठिकाणी परिषदेच्या शाखासभांची योजना करणे व पृथकपणे साहित्यकार्य करणाऱ्या साहित्यसंस्था संलग्न करणे.

( इ ) अन्य भाषांच्या साहित्यसंस्थांशी व साहित्यविषयक चळवळींशी अवश्य व शक्य असेल तेथे सहकार्य करणे.

( ई ) व्याकरण व कोश, इतिहास, विज्ञान व समाजशास्त्र, तसेच कला, साहित्य इत्यादी विषयांवर ग्रंथ लिहून घेणे, प्रसिद्ध करणे व अशा तऱ्हेच्या ग्रंथनिर्मितीस द्रव्यद्वारा अगर अन्यरीत्या साहाय्य करणे.

( उ ) ज्ञानाची सर्व साधने मराठी वाचकांना सुलभ करून देण्याकरिता चर्चा, उत्सव व प्रदर्शन आदी प्रसंग घडवून आणणे, मासिके व नियतकालिके चालविणे, ग्रंथालय चालविणे, संशोधनाची कामे चालविणे व अन्यत्र चाललेल्या संशोधनकार्यास प्रोत्साहन देणे व साहाय्य करणे.

( ऊ ) शास्त्रीय विषयांची परिभाषा ठरविणे व पारिभाषिक कोश तयार करणे.

( ए ) प्राचीन व अर्वाचीन मराठीतील, तसेच अन्य भाषांतील नामवंत ग्रंथकार यांची चरित्रे छापून प्रसिद्ध करणे व त्यांच्या साहित्याची माहिती मराठी वाचकांस उपलब्ध करून देणे.

( ऐ ) मराठी भाषा व साहित्य यांच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी जरूर ती उपाययोजना करणे, खेडोपाडीच्या समाजात मराठी साहित्याविषयी अधिक प्रीती, आस्था व जागृती उत्पन्न करणे.

( ओ ) सामान्यतः परिषदेचे उद्देश साध्य होण्याकरिता जरूर वाटतील त्या सर्व गोष्टी करणे.

( औ ) मराठी साहित्य महामंडळाने केलेले ठराव अमलात आणणे.

**४. वर्ष गणना**–परिषदेचे वर्ष १ एप्रिल ते ३१ मार्च असावे.

**५. कार्यालय**–परिषदेचे मुख्य कार्यालय पुणे येथे राहील. परिषदेचे शिलकी दप्तर, पुस्तकालय आणि परिषदेची जी इतर जिंदगी वगैरे परिषदेची साधारण सभा नेमून देईल त्या सर्वांचा संग्रह आणि संरक्षण या मुख्य कार्यालयात होईल. शिवाय या कार्यालयात परिषदेचा इतर कोणताही व्यवहार साधारण सभेच्या ठरावान्वये चालविता येईल.

**६ सभासदवर्ग**–परिषदेचे सभासद पुढीलप्रमाणे आठ प्रकारचे असतील.

( १ ) उपकर्ते–परिषदेस ५००० ( पाच हजार ) किंवा अधिक रुपये देणारे.

( २ ) आश्रयदाते–परिषदेस १००० ( एक हजार ) किंवा अधिक रुपये देणारे.

( ३ ) साहाय्यक–परिषदेस ५०० ( पाचशे ) किंवा अधिक रुपये देणारे.

( ४ ) हितचिंतक–परिषदेस १५० ( दीडशे ) किंवा अधिक रुपये देणारे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

( ५ ) तहह्यात–परिषदेस १०० ( शंभर ) किंवा अधिक रुपये देणारे.

( ६ ) साधारण–वार्षिक वर्गणी ५ ( पाच ) किंवा अधिक रुपये देणारे. ज्या सभासदाकडे एक वर्षाची वर्गणी बाकी थकली असेल त्यास परिषदेची पत्रिका मिळणार नाही. मात्र त्याने ही बाकी दिल्यास त्यास मागील सालचे अंक शिल्लक असल्यास मिळतील.

( ७ ) प्रतिनिधि–सभासद–घ. नि. ११ ( इ )प्रमाणे संलग्न संस्थांनी नेमलेले प्रतिनिधी.

( ८ ) सामान्य सभासद–अलौकिक विद्वत्ता अथवा मराठी भाषेची विशेष सेवा या गुणांसाठी कोणाही साहित्यिकास परिषदेचे सन्मान्य सभासद करावे अशी लेखी सूचना परिषदेच्या दहा सभासदांनी केल्यास त्या सूचनेवर कार्यकारी मंडळाने परिषदेच्या सभासदांची, वार्षिक किंवा विशेष साधारण सभेच्या सूचनांच्या लगत लेखी मते मागवावी व परिषदेच्या दोन तृतीयांश सभासदांचे त्या सूचनेस अनुकूल मत असल्यास अशा साहित्यिकास परिषदेचे सन्मान्य सभासद निवडल्याचे त्या त्या साधारण सभेत जाहीर करण्यात यावे. म. सा. संमेलनाचे सर्व अध्यक्ष हे म. सा. परिषदेचे सन्मान्य सभासद समजले जातील.

**७. सभासद मंजुरी**–सभासद होऊ इच्छिणाऱ्या २१ वर्षांवरील कोणाही स्त्रीने अगर पुरुषाने परिषदेचे उद्देश, घटना व नियम मान्य करून ठरलेल्या नियमांप्रमाणे वर्गणीसह अर्ज करावा. कार्यकारी मंडळाने आपल्या प्रथमच्या सभेत कार्याध्यक्ष, परिषदेचे एक चिटणीस आणि आपणांतून निवडून दिलेले दोन सभासद अशा चार सभासदांची एक उपसमिती नेमावी. या उपसमितीने सभासदत्वाच्या सर्व अर्जांचा निर्णय करावा. अर्ज पोहोचल्यापासून एक महिन्याच्या आत त्या अर्जांचा निकाल अर्जदारास कळविला पाहिजे. सदर समितीने नामंजूर केलेले अर्ज ताबडतोब कार्यकारी मंडळाकडे पाठवावे व त्यांचा निर्णय कार्यकारी मंडळाने करावा.

**८. सभासद अधिकारः**— ( अ ) कोणाही अर्जदारास त्याच्या सभासदत्वास मंजुरी मिळाल्यापासून परिषदेच्या सर्व सभांस हजर राहण्याचा, तेथे होणाऱ्या चर्चेत भाग घेण्याचा, मत देण्याचा, कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठेवलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त हिशेब, दप्तर, व इतर कागदपत्र पाहण्याचा, हे व इतर सर्व प्रकारचे सभासदत्वाचे अंगभूत हक्क राहतील. परंतु घटनाविषयक प्रश्न, सर्व प्रकारचे आर्थिक प्रश्न, म. सा. प. चा वार्षिक अहवाल, अंदाजपत्रक व घटनानियमानुसार होणाऱ्या निवडणुकी इत्यादी बाबीसंबंधाने मत देण्याचा अधिकार फक्त अशाच सभासदांस राहील की ज्यांना सभासद म्हणून मंजूर झाल्यापासून बारा महिने पूर्ण झाले असतील.

( आ ) परिषदेचे दप्तर, कागदपत्र, हिशेब, वगैरे पाहणे असल्यास तशा अर्थाची कमीत कमी तीन दिवसांची पूर्वसूचना चिटणिसांस दिल्याने पाहिजे असलेले कागदपत्र, कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठरविलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त कार्यालयाच्या वेळात कार्यालयाच्या सोईने पहावयास मिळतील.

**९. सभासद वर्गणी, थकबाकी इत्यादीः**– ( अ ) साधारण सभासदांनी प्रत्येक वर्षाच्या पहिल्या तिमाहीत आपली सभासदत्वाची वर्गणी भरली पाहिजे. कोणत्याही सभेत किंवा निवडणुकीत वर्गणी बाकी असणाऱ्या कोणाही सभासदास मत देता येणार नाही.

( आ ) लागोपाठ दोन वर्षांची वर्गणी थकली असेल अशा सभासदांस व्यक्तिशः लेखी पंधरा दिवसांची पूर्वसूचना देऊन कार्यकारी मंडळाच्या संमतीने चिटणिसांस त्यांचे नाव पटावरून काढून टाकता येईल; अशा व्यक्तीस पुनः सभासद होणे असल्यास बाकी थकलेली सर्व वर्गणी सभासदत्वाच्या नूतन अर्जासोबत भरली पाहिजे.

**१०. अधिकारी मंडळेः**–परिषदेची दोन अधिकारी मंडळे असावीत : ( १ ) नियामक मंडळ, व ( २ ) कार्यकारी मंडळ.

**११. नियामक मंडळ**– नियामक मंडळाची रचना खालीलप्रमाणे असावीः

( अ ) **अधिकारपरत्वे सभासद**– १ परिषदेचे अध्यक्ष, ५ परिषदेचे उपाध्यक्ष, १ परिषदेचे कार्याध्यक्ष व १ खजिनदार असे एकूण ८

( आ ) **विभागीय सभासद**– या निवडणुकीकरिता सभासदांचे पुढीलप्रमाणे गट करण्यात येत आहेत. यांपैकी प्रत्येक गटामागे कमीत कमी १ आणि अधिकात अधिक २० सभासद खालीलप्रमाणे निवडता येतील. ज्या गटात १५ किंवा १५



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पेक्षा कमी सभासद असतील त्या गटामागे १ सभासद व ( २ ) ज्या गटात १५ पेक्षा अधिक सभासद असतील त्या गटाकरिता दर १५ पूर्ण संख्येस १ या प्रमाणे सभासद निवडता येतील. पण कोणत्याही गटातर्फे २० पेक्षा अधिक सभासद नियामक मंडळावर निवडले जाणार नाहीत. गट : १ पुणे. २ सातारा. ३ सांगली. ४ कोल्हापूर. ५ सोलापूर. ६ अहमदनगर. ७ धुळे ८ जळगाव. ९ कुलाबा. १० रत्नागिरी. ११ नाशिक. १२ ठाणे. १३ बेळगाव-कारवार. १४ गोवा. १५ उर्वरित भागातील आजीव सभासद.

( इ ) **संलग्न संस्थांचे प्रतिनिधी**– ५० किंवा अधिक सभासद असल्यास प्रत्येक संस्थेस १; ५० पेक्षा कमी सभासद असल्यास एकाच विभागातील संस्था एकत्र होऊन ५० संख्या झाल्यास त्या सर्वांस मिळून १.

( ई ) **स्वीकृत सभासद**– आवश्यक वाटल्यास नियामक मंडळास १० पर्यंत सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार आहे.

**१२. अध्यक्ष निवडणूक** – जाहीर सूचना देऊन चिटणिसांनी परिषदेच्या सभासदांकडून मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी नावे मागवावीत. अध्यक्षपदाच्या निवडणुकीसाठी उभा असणारा उमेदवार म. सा. परिषदेचा निवडणुकीच्या तारखेपूर्वी किमान एक वर्ष सभासद असला पाहिजे व सूचनापत्राबरोबर त्याची लेखी संमती असली पाहिजे. सूचक व अनुमोदक हे परिषदेचे सभासद असले पाहिजेत. सूचित झालेल्या उमेदवारांची नावे निवडणुकीसाठी परिषदेच्या सभासदांकडे पाठवावी. निवडणूक क्रमवार पद्धतीने होईल व ज्याला सर्वांत अधिक मते मिळतील तो संमेलनाध्यक्षपदी निवडून आला असे जाहीर करण्यात येईल. अशा रीतीने निवडून आलेला संमेलनाचा अध्यक्ष पुढील संमेलनापर्यंत म. सा. परिषदेचा अध्यक्ष राहील.

**१३. नियामक मंडळाची निवडणूक**— ( अ ) नियामक मंडळातील अध्यक्षाखेरीज इतर पदाधिकारी व विभागीय सभासद यांची निवडणूक त्रैवार्षिक असावी व ती गुप्त मतदान पद्धतीने करण्यात यावी. या निवडणुकीकरिता त्या त्या विभागातील उमेदवारासच त्या त्या विभागातील मतदार सभासदांची लेखी मते मागवून त्या त्या विभागात निवडून येता येईल.

[ नियामक मंडळांची कामे वगैरे नियम पाहा:— २४ ते २८ ]

( आ ) परिषदेच्या कार्यालयात पत्ता नोंदला असेल त्याप्रमाणे सभासदाचा विभाग समजण्यात यावा. पत्ता बदलला असल्यास सभासदाने निवडणुकीच्या दिवसाच्या निदान तीन महिने आधी कार्यालयाकडे तसे लेखी कळविले पाहिजे.

( इ ) निवडणुकीच्या आधी दोन महिने मतदानास पात्र असलेल्या सभासदांची यादी कार्यकारी मंडळाने तयार करावी व विभागवार सभासदांची यादी त्या त्या विभागांतील सभासदांकडे पाठवून सभासदांकडून निरनिराळ्या जागांसाठी सूचितांची नावे मागवावी.

( ई ) सूचना करणाराने सूचित उमेदवारांची लेखी अनुमती कार्यालयाकडे पाठविली पाहिजे.

( उ ) निवडणुकीच्या दिवसाच्या आधी निदान एक महिना सूचितांची नावे सूचक व अनुमोदक यांच्या सहीने चिटणिसांकडे आली पाहिजेत. चिटणिसांनी प्रत्येक निवडणुकीच्या मतदानपत्रिका व सूचित उमेदवारांच्या याद्या मतदारांकडे निवडणुकीच्या दिवसाच्या निदान पंधरा दिवस आधी रवाना केल्या पाहिजेत.

( ऊ ) सूचित उमेदवारांपैकी ज्यांना अधिक मते पडतील ते निवडून आले असे समजावे. एकाहून अधिक उमेदवारास सारखी मते पडल्यास चिठ्या टाकून त्यांतील एक निवडला जाईल.

( ऋ ) प्रत्येक संलग्न संस्थेने पुढील नियामक मंडळावर पाठवावयाच्या आपल्या प्रतिनिधीचे नाव परिषदेच्या कचेरीकडे निवडणुकीपूर्वी एक महिना पाठवावे.

**१४. कार्यकारी मंडळाची रचना**—( अ ) कार्यकारी मंडळाचे ११ सभासद गुप्त, लेखी मतदानपद्धतीने नियामक मंडळाने आपणांतून निवडावे. हे ११ सभासद, कार्याध्यक्ष व खजिनदार मिळून १३ जणांचे कार्यकारी मंडळ होईल. या कार्यकारी मंडळाने आपल्या पहिल्या सभेत दोन अधिक सभासद स्वीकृत करून घ्यावे. हे दोन सभासद इतर रीतीने नियामक मंडळाचे सभासद नसल्यास ते अधिकारपरत्वे नियामक मंडळाचे सभासद होतील.

[ कार्यकारी मंडळाची कामे वगैरे नियम पहा—६ ( ८ ), २९ ते ३४, ३७, ४५, ४७, ४८, ४९, ५२, ५४, ५५ ]

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(आ) परिषदेचे चालू कार्यालय जेथे असेल तेथीलच कार्याध्यक्ष, खजिनदार असावेत. कार्यकारी मंडळातील ११ सभासदांपैकी चालू कार्यालय जेथे असेल तेथील किमान ५ व बाहेरील किमान ६ असावे. ३ चिटणिसांपैकी एक तरी स्थानिक असावा.

(इ) कोणासही एकाच वेळी पदाधिकाऱ्यांच्या एकाहून अधिक जागांकरिता उभे राहता येणार नाही. तसेच पदाधिकारी व नि. मं. चा सभासद या दोन्ही जागांस एका वेळी उभे राहता येणार नाही.

**१५. संपादकमंडळ:**—परिषदेच्या साहित्य पत्रिकेसाठी कार्यकारी मंडळाने एक संपादक निवडावा. तो कार्यकारी मंडळाचा सभासद नसल्यास १४ [ अ ] मध्ये असलेल्या स्वीकृति–नियमाप्रमाणे स्वीकृत करून घ्यावा. या व इतर संपादकीय कार्यासाठी कार्यकारी मंडळाने संपादकासुद्धा ५ सभासदांचे एक संपादकमंडळ निवडावे. परिषदेच्या चिटणीसांपैकी एक चिटणीस संपादकमंडळाचा पदसिद्ध सभासद राहील. पत्रिकेचा संपादक हा त्या संपादकमडळाचा अध्यक्ष असावा.

[ संपादक मंडळाची कामे वगैरे नियम पाहा :—४२ ].

**१६. परिषदेची वार्षिक साधारण सभा**—१. महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा वर्ष संपल्यापासून तीन महिन्यांच्या आत भरविली पाहिजे.

२. ही वा. सा. सभा म. सा. प. च्या मुख्य कार्यालयाच्या गावी भरेल.

३. वर (२) दर्शविलेल्या स्थळी वरील (१) प्रमाणे दिलेल्या मुदतीच्या आत ही सभा भरविण्यास अडचण उद्भवल्यास कार्यकारीमंडळाने नियामक मंडळाची विशेष सभा बोलवावी. नियामक मंडळाने आणखी एक महिन्याच्या आत म्हणजे वर्ष संपून चार महिने पूर्ण होण्याच्या आत वरील (२) प्रमाणे ही सभा भरविण्याची तजवीज करावी. याप्रमाणे भरविलेल्या सभेत खाली (४) मधील नमूद केलेले कारभारी कामच फक्त करण्यात येईल.

**४. वार्षिक साधारण सभा**—१. या सभेत म. सा. प. चे गतवर्षाचे कार्यवृत्त, २. गतवर्षाचे रीतसर तपासून घेतलेले हिशेब, ३. पुढील वर्षाचे अंदाजपत्रक, ४. हिशेबतपासनिसांची निवडणूक, ५. घटनेत करावयाच्या दुरुस्त्या-पुरुस्त्या, ६. पोटसमित्यांची व विशेष समित्यांची नेमणूक, ७. सेवकवर्ग, जिंदगी वगैरे कारभारासंबंधीचे प्रश्न, नवीन योजना किंवा ठराव इत्यादी सर्व प्रकारचे विषय रीतसर लेखी पूर्वसूचना देऊन ठेवण्यात येतील. याशिवाय कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ किंवा सभासद यांजकडून आलेले ठराव, अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळी आलेले विषय, साहित्य संमेलनाकडून आलेले ठराव यांचाही या सभेत विचार होईल.

**१७. परिषदेची विशेष साधारण सभा:**—याशिवाय जरूर लागेल तेव्हा अध्यक्षांनी अथवा कार्यकारी मंडळाने परिषदेची विशेष साधारण सभा बोलवावी. [ इतर नियम, २२, ५१ पाहा ].

**१८. गणसंख्या:**—परिषदेच्या सभांस एकूण सभासदांच्या $\frac{1}{20}$ किंवा ५० यांपैकी कमी असेल ती संख्या ही गणसंख्या मानली जाईल. गणसंख्येच्या अभावी तहकूब राहिलेली सभा त्याच दिवशी व त्याच ठिकाणी पहिल्या सभेच्या वेळेपासून अर्ध्या तासाच्या अवधीनंतर भरेल. अशा सभेत कार्यक्रमपत्रिकेवर असलेल्या प्रश्नांचाच फक्त विचार करता येईल.

**१९. पोटमंडळे**—परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्याकरिता किंवा दुसऱ्या कोणत्याही विशिष्ट कार्याकरिता जरूर वाटल्यास एक किंवा अनेक पोटसमित्या किंवा विशिष्ट मंडळे नेमण्याचा अधिकार परिषदेच्या साधारण सभेस आहे.

**२०. ठराव, सूचना इत्यादी**—(अ) म. सा. परिषदेचा वार्षिक अहवाल व हिशेब, वार्षिक सभेच्या आधी निदान पंधरा दिवस चिटणिसांनी प्रत्येक सभासदाकडे पाठवावे. कोणाही सभासदास अहवाल अथवा हिशेब यासंबंधी वार्षिक सभेत ठराव मांडणे असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना सभेच्या अगोदर सात दिवस कार्याध्यक्षास पाठविली पाहिजे.

(आ) परिषदेच्या धोरणासंबंधी वा घटना दुरुस्तीसंबंधी सभासदास काही ठराव वार्षिक सभेपुढे मांडण्यासाठी म्हणून पाठवायचे असल्यास त्याने ते वर्षअखेरपूर्वी कार्यालयात लेखी पाठवावेत.

**२१. सभेची सूचना**—परिषदेच्या वार्षिक सभेची सूचना सभासदांकडे सभेच्या दिवसापूर्वी निदान पंधरा दिवस आधी चिटणिसांनी पाठवावी.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचले तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

**२२. मागणी सभा**—परिषदेचा मताधिकार असलेल्या पन्नास सभासदांनी लेखी मागणी केल्यास परिषदेची विशेष सभा अध्यक्षांनी बोलवावी. मागणीचे रीतसर पत्र त्यांस पोहोचल्यापासून दोन महिन्यांच्या आत ही सभा अध्यक्षांनी बोलाविली पाहिजे; न बोलावली तर सदर मागणी करणाऱ्या सभासदांनी तीन प्रमुख मराठी वर्तमानपत्रांतून आपल्या सह्यांच्या निमंत्रणपत्राने सभा बोलवावी. अशा सभेत मागणीपत्रात लिहिलेल्या कामाव्यतिरिक्त दुसरे काम करता येणार नाही.

**२३. अध्यक्ष**—परिषदेच्या व नियामक मंडळाच्या कोणत्याही सभेत परिषदेचे अध्यक्ष हेच अध्यक्ष होतील; अध्यक्ष हजर नसल्यास हजर असलेल्या उपाध्यक्षांपैकी एक उपाध्यक्ष सभेचा अध्यक्ष म्हणून निवडावा. कोणीही उपाध्यक्ष हजर नसल्यास सभेने खजिनदार, चिटणीस व निधिधारक यांखेरीज इतर कोणाही सभासदास त्या सभेपुरता अध्यक्ष निवडावा.

**२४. नियामक मंडळाची कामे**—( १ ) नियामक मंडळाची कामे सर्वसाधारणपणे खालीलप्रमाणे आहेत :—

( अ ) परिषदेचे मूलभूत उद्देश व तिच्या साधारण सभेचे ठराव यांस अनुसरून कार्याची दिशा ठरविणे, कार्यकारी मंडळ निवडणे व त्याच्या कामावर देखरेख ठेवणे.

( आ ) कार्यकारी मंडळाने तयार केलेले वार्षिक अंदाजपत्रक योग्य वाटतील ते फेरफार करून मंजूर करणे.

( इ ) कार्यकारी मंडळाने तयार केलेला वार्षिक अहवाल व हिशेब विचारात घेऊन ते मंजूर करणे.

( ई ) वार्षिक सभेपुढे मांडावयाच्या प्रश्नांचा विचार करणे.

( २ ) संमेलनानंतर नियामक मंडळाची एक सभा भरेल. या सभेत वा. सा. सभेने मंजूर केलेल्या ठरावाच्या अंमलबजावणीची योजना, पोटसमित्यांची निवड, पुढील कार्याची रूपरेषा ठरविणे वगैरे कामे केली जातील.

**२५. नि. मं. ची जादा सभा**—याशिवाय अध्यक्ष किंवा कार्यकारी मंडळ यांस नियामक मंडळाची जादा सभा बोलविण्याचा अधिकार राहील.

**२६. नि. मं. ची सभेची सूचना**—नियामक मंडळाच्या कोणत्याही सभेची सूचना सभासदांकडे सभेच्या दिवसापूर्वी निदान पंधरा दिवस चिटणिसांनी पाठवावी.

**२७. नि. मं. ची गणसंख्या**—नियामक मंडळाच्या सभेस २० ही गणसंख्या राहील. गणसंख्येच्या अभावी तहकूब राहिलेली सभा त्याच दिवशी, त्याच ठिकाणी पहिल्या सभेच्या वेळेपासून अर्धा तासाच्या अवधीनंतर भरेल; अशा सभेत कार्यक्रमपत्रिकेवर असलेल्या प्रश्नांचाच फक्त विचार करता येईल [ ३३ आ नियम पाहा ].

**२८. नि. मं. ची मागणी सभा**—नियामक मंडळाच्या अस्तित्वात असलेल्या सभासदांपैकी एकपंचमांश सभासदांनी विशिष्ट कारण दर्शवून सभेची लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणिसांनी पंधरा दिवसांच्या आत बोलाविली पाहिजे. अशा सभेत मागणीपत्रात लिहिलेल्या कामाव्यतिरिक्त दुसरे काम करता येणार नाही.

**२९. कार्यकारी मंडळाची कामे**—कार्यकारी मंडळाची कामे सर्वसाधारणपणे खालीलप्रमाणे राहतील :—

परिषदेच्या नियमांप्रमाणे सधारण सभा भरविण्याची व्यवस्था करणे; महाराष्ट्र साहित्य पत्रिका चालविणे; साधारण सभेने केलेल्या ठरावांची अंमलबजावणी करणे; परिषदेमार्फत होणाऱ्या प्रकाशनाची व्यवस्था करणे; वार्षिक अहवाल, हिशेब, अंदाजपत्रक ही तयार करून नियामक मंडळापुढे मंजुरीकरिता मांडणे; परिषदेच्या कार्याकरिता द्रव्यनिधी जमविणे, उपकर्ते, आश्रयदाते वगैरे मिळविणे; नियमानुसार निधीची व्यवस्था करणे; शाखासभा स्थापन करणे; संलग्न संस्था नोंदविणे; नियामक मंडळाच्या निवडणुकीची व्यवस्था करणे; परिषदेच्या मूलभूत उद्देशास धरून व ठरावास विरोधक नसतील असे जरूर वाटतील ते उपाय योजणे; उद्देशात व ठरावात दर्शविलेल्या गोष्टी घडवून आणण्यासाठी झटणे व चळवळ करणे; वेळोवेळी उत्पन्न होणाऱ्या किंवा उत्पन्न होणे संभवनीय असलेल्या महत्त्वाच्या प्रश्नांबद्दल मराठी भाषा बोलणाऱ्या समाजात जागृती करून तशा प्रश्नासंबंधी परिषदेचे धोरण ठरविण्यास साहाय्यभूत होतील असे निर्बंध, ठराव वगैरे परिषदेपुढे आणण्याची व्यवस्था करणे; परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्यासाठी इतर जरूर ते प्रयत्न करणे; परिषदेकडे आलेल्या सर्व पैशांचा विनियोग अंदाजपत्रकाबरहुकूम करणे; नियामक मंडळ व सर्वसाधारण सभा नेमून देईल ती सर्व कार्ये वेळोवेळी पार पाडणे; परिषदेचे दप्तर सांभाळणे आणि सांठविलेल्या जिंदगीचे रक्षण करणे; ग्रंथालय चालविणे; चिटणिसांची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

निवड करणे, महामंडळाचे ठराव अंमलात आणणे, महामंडळाच्या घटनेत दुरुस्ती सुचविणे, व महामंडळाने स्वतःच्या घटनेत सुचविलेल्या दुरुस्त्यांना मान्यता देणे, महामंडळावर तीन प्रतिनिधी निवडून पाठविणे, निरनिराळ्या साहित्यिक व सांस्कृतिक परिषदांतून प्रतिनिधित्व करणे. ( कार्यकारी मंडळ निवडणूक नियम १४ पाहा ).

**३०. का. मं. ची सभाः**- कार्यकारी मंडळाची सभा दर तिमाहीस निदान एकदा तरी व्हावी.

**३१. का. मं. सभेची सूचनाः**- ( अ ) कार्यकारी मंडळाच्या सभेची सूचना निदान सात दिवस आगाऊ दिली पाहिजे.

( आ ) कार्यकारीमंडळाच्या व पोटसमितीच्या सभांच्या सूचना व वृत्तान्त अध्यक्षाकडे पाठविले पाहिजेत.

**३२. का. मं. ची मागणी सभाः**- कार्यकारी मंडळाच्या पाच सभासदांनी विशिष्ट कामाकरिता लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणिसांनी भरविली पाहिजे आणि सभासदांस तिची सूचना चार दिवस पूर्वी दिली पाहिजे. चिटणिसांनी सभा न भरविल्यास मागणी करणारांनी कार्यकारी मंडळाच्या सर्व सभासदांस चार दिवसांची लेखी सूचन देऊन तशी सभा त्या कामाकरिता भरवावी. त्या कामाबाबतचे या सभेचे ठराव कार्यकारी मंडळाला बंधनकारक राहतील

**३३. का. मं. ची गणसंख्याः**- ( अ ) कार्यकारी मंडळाच्या सभेस पाच सभासदांची गणसंख्या मानली जाईल

( आ ) गणसंख्येच्या अभावी तहकूब राहिलेल्या सभेला गणसंख्येची जरुरी नाही.

**३४. जरुरीची कार्यमंजुरीः**- कार्यकारी मंडळाची सभा बोलावण्यास सवड नसेल तेव्हा जरुरीची कामे सभासदांचे लेखी अभिप्राय मागवून करता येतील. त्यानंतर होणाऱ्या कार्यकारी मंडळाच्या सभेला असे झालेले कार्य कळविले पाहिजे; मात्र कार्यकारी मंडळाच्या एकचतुर्थांश सभासदांनी लेखी अभिप्रायांनी काम करण्यास असंमती लिहून कळविली तर त्या कामासाठी सभा बोलविली पाहिजे.

**३५. द्रव्यनिधी व खर्च**— वर्गण्या, देणग्या, इतर रकमा वगैरे वसूल करण्याचे व पावत्या देण्याचे काम चिटणिसांचे आहे. अशा वसुलीतून किरकोळ खर्चाकरिता ५० रुपयेपर्यंतची रक्कम स्वतःजवळ ठेवून बाकीच्या वसूल झालेल्या रकमा चिटणिसाने खजिनदाराकडे जमा कराव्या व खर्चाकरिता मंजुरी असेल त्याप्रमाणे मंजूर केलेल्या रकमा वेळोवेळी खजीनदाराकडून मागवून घ्याव्या आणि अंदाजपत्रकानुसार किंवा कार्यकारी मंडळाच्या ठरावानुसार खजीनदाराने त्या चिटणिसास द्याव्या.

**३६. द्रव्यनिधीचे प्रकारः**— परिषदेच्या द्रव्यनिधीचे चार वर्ग असतीलः—( १ ) निधिधारकांकडे असलेला पैसा, ( २ ) उपकर्ते, आश्रयदाते, साहाय्यक, हितचिंतक व तहहयात सभासद यांच्या वर्गण्या ( सदरहू रक्कम कायम निधी म्हणून समजण्यात येईल ). ( ३ ) साधारण सभासद, व संलग्न संस्था यांच्या वर्गण्या, किरकोळ देणग्या व इतर उत्पन्न आणि ( ४ ) विशेष कार्याकरिता दिलेल्या देणग्या किंवा वर्ग २ ते ४ या सभासदांनी विशेष कार्याकरिता दिलेल्या वर्गण्या, पारितोषिक वगैरे रकमा. यांपैकी दुसऱ्या वर्गातील रकमा निधिधारकांकडे कायमनिधीत जमा होतील. तिसऱ्या वर्गातील रकमा व पहिल्या वर्गातील रकमेवरील व्याज किंवा नफा खजीनदाराकडे भरून नित्य व नैमित्तिक खर्चाकडे लावण्यात येईल. चवथ्या वर्गातील रकमा, होता होईल तो, दात्यांच्या इच्छेप्रमाणे व शर्तीप्रमाणे खर्च कराव्या. कोणत्याही वर्षी जमा होणाऱ्या दुसऱ्या वर्गातील वर्गणीपैकी निम्म्या वर्गणीइतकी रक्कम नियामक मंडळाला त्या वर्षाच्या चालू खर्चासाठी मंजूर करण्याचा अधिकार आहे. तसेच शाखासभेच्या कक्षेतील वर्ग २ मधील सभासदांच्या वर्गणीपैकी $\frac{1}{3}$ रक्कम त्या त्या शाखासभेला तिचे कार्य चालण्यासाठी देण्याचा अधिकार नियामक मंडळास राहील.

**३७ कायम निधीची व्यवस्थाः**—कायम निधी व स्थावर मिळकत निधिधारकांच्या नावे असावी व त्यांच्याच ताब्यात राहावी. कायम निधिव्यतिरिक्त सर्व पैसा खजीनदाराकडे राहावा. वसूल आलेल्या सर्व रकमा चिटणिसांनी वरील ३५ व ३६ या नियमांना अनुसरून खजीनदार व निधिधारक यांच्याकडे जमा कराव्या. वार्षिक अहवाल व हिशेब तयार करण्याच्या वेळी निधिधारकांनी कायमनिधीचा व आपल्या ताब्यातील मालमत्तेचा वार्षिक हिशेब कार्यकारी मंडळाला द्यावा. पब्लिक ट्रस्ट ॲक्टप्रमाणे कायमनिधीची गुंतवणूक विश्वस्तांनी करावी. चालू खर्चासाठीचे द्रव्य चांगल्या सुस्थितीत अशा शेड्यूल बँकेत ठेवावे

**३८. विश्वस्तत्व रद्द करणे**— म. सा. परिषदेच्या साधारण सभेच्या कार्यक्रमपत्रिकेवर एतद्विषयक ठराव मांडून व त्याबाबतचे विश्वस्तांचे म्हणणे त्यांना आगाऊ पूर्वसूचना देऊन ते ऐकून घेऊन उपस्थित सभासदांच्या $\frac{2}{3}$ मताधिक्याने



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचाल तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

अविश्वासदर्शक ठराव पास झाल्यास विश्वस्तांनी आपल्या अधिकाराचा राजीनामा देऊन आपल्या ताब्यातील परिषदेची सर्व मालमत्ता व द्रव्यनिधी कार्यकारी मंडळाच्या स्वाधीन केला पाहिजे. तसेच द्रव्यनिधी किंवा मालमत्ता यांबद्दल विश्वस्त व कार्यकारी मंडळ यांच्यामध्ये मतभेद उत्पन्न झाल्यास परिषदेचे बहुमत उभय पक्षांनी मान्य केले पाहिजे. वार्षिक अहवालाच्या वेळी विश्वस्तांनी आपल्या ताब्यातील मालमत्तेचा अहवाल चिटणिसांकडे पाठवावा. हा ठराव विश्वस्त व सभासद यांस पूर्वसूचना दिल्याशिवाय विचारात घेऊ नये. असल्या ठरावास तीनपंचमांश बहुमताचे बंधन असावे.

**३९. ठराव बंधनः—** परिषदेच्या निधिधारणाबाबत इंडियन ट्रस्ट ॲक्ट, सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट-पब्लिक ट्रस्ट ॲक्ट व परिषदेचे ट्रस्टडीड यांस अविरोधी असे परिषदेच्या साधारण सभेचे सर्व ठराव विश्वस्तांवर बंधनकारक राहतील.

**४०. नवीन विश्वस्तपत्रः** --१–१–३७ पासून जी घटना अमलात आली, त्यानंतर परिषदेकडे येणाऱ्या रकमा व मिळकत यांबाबत नवे ट्रस्टडीड व नियम परिषदेने करावे.

**४१. बँकखाते व हिशेब :–** कायम निधीवरील वार्षिक व्याज, साधारण सभासदांच्या वर्गण्या, तसेच किरकोळ देणग्या या रकमा परिषदेच्या नावाने शेड्यूल बँकेत जमा राहतील. बँकेतील जमेपैकी रकमा काढावयाच्या असल्यास त्या खजीनदार व अध्यक्ष किंवा चिटणीस यांपैकी एक अशा दोघांच्या सह्यांनी काढता येतील अशी व्यवस्था करावी.

**४२. संपादकमंडळाची कामेः--** ( अ ) साहित्य परिषदेच्या कार्यासंबंधीचा मजकूर चिटणिसांकडून येईल तो संपादकाने पत्रिकेमध्ये दाखल केला पाहिजे. पत्रिकेच्या सर्वसामान्य धोरणासंबंधी कार्यकारी मंडळाचे ठराव संपादकावर व संपादक मंडळावर बंधनकारक असतील.

( आ ) नियम ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निरनिराळ्या विषयांवर ग्रंथ तयार करण्याची योजना करणे; तसेच बाहेरून येणारे ग्रंथ तपासून त्यासंबंधी कार्यकारी मंडळास सल्ला देणे.

( इ ) याशिवाय कार्यकारी मंडळाच्या सल्ल्याने परिषदेचे उद्देश साध्य करण्यासाठी जरूर ते कार्य करणे. [ संपादकमंडळ निवडणूक नियम १५ पाहा. ]

**४३. संमेलनविषयक नियमः—** ( अ ) परिषदेच्या संमेलनविषयक नियम शाखासभेने किंवा शाखासभा नसल्यास संलग्न संस्थेने ज्या ठिकाणी आमंत्रण दिले असेल तेथे परिषदेचे मराठी साहित्य संमेलन भरेल.

(आ) म. सा. संमेलनाला निमंत्रण देऊ इच्छिणाऱ्या संस्थेने पुढील वर्षाच्या संमेलनासाठी द्यावयाचे निमंत्रण चालू वर्षाच्या संमेलनापूर्वी निदान एक महिना अगोदर म. सा. प. च्या कार्यालयाकडे पाठविले पाहिजे. याप्रमाणे आलेल्या सर्व निमंत्रणांचा विचार करून कार्यकारी मंडळाच्या बैठकीत ज्या ठिकाणचे निमंत्रण बहुमताने स्वीकारले जाईल, तेथे म. सा. संमेलन भरेल.

४४. निमंत्रकसंस्थेने म. सा. संमेलनाच्या अधिवेशनापूर्वी निदान चार महिने स्वागतमंडळ बनवावे, व स्वागत मंडळाच्या पदाधिकाऱ्यांची निवडणूक करावी. संमेलनविषयक सर्व कामे स्वा. मं. चे पदाधिकारी निवडले जाईपावेतो निमंत्रक संस्थेचे पदाधिकारी तात्पुरते अधिकारी म्हणून काम करतील. येणेप्रमाणे करण्याची सर्व कामे स्वा. मं. ने म. सा. प. च्या कार्यकारी मंडळाच्या संमतीने करावयाची आहेत.

४५. निमंत्रित स्थळी म. सा. संमेलनाच्या अधिवेशनाच्या तयारीच्या सिद्धतेसाठी मार्गदर्शनाकरिता म. सा. प. च्या का. मं. ने आपले नियुक्त प्रतिनिधी पाठवून स्वा. मं. ला साहाय्य करावे. स्वा. मं. ने या प्रतिनिधीस सर्व प्रकारची माहिती पुरवून त्याच्या सल्ल्याप्रमाणे काम केले पाहिजे.

**४६. म. सा. संमेलन विषयक नियमः—** ( १ ) प्रतिनिधित्वः--म. सा. प. चे उद्देश मान्य असणाऱ्या २१ वर्षांवरील कोणाही पुरुषास अगर स्त्रीस संमेलनाच्या कार्यक्रमात त्या वेळच्या बैठकीसाठी केलेल्या नियमांस लेखी मान्यता देऊन व त्यासाठी ठरलेला आकार देऊन मतदार प्रतिनिधी म्हणून भाग घेता येईल. इतरांना फक्त निमंत्रित पाहुणे किंवा प्रेक्षक म्हणून बैठकीसाठी केलेल्या नियमांप्रमाणे त्या कार्यक्रमात भाग घेता येईल.

( २ ) अध्यक्ष निवडणूक :--( नि. १२ पाहा. )

( ३ ) ठराव--संमेलनाच्या अधिवेशनात म. सा. प. च्या उद्देशकक्षेत येणाऱ्या कोणत्याही विषयासंबंधीचे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ठराव मांडता येतील. म. सा. परिषद, शाखासभा, संलग्न संस्था व त्या वेळेपर्यंत नोंदलेले प्रतिनिधी यांनाच फक्त हे ठराव पाठविण्याचा अधिकार आहे. असे ठराव संमेलनाच्या अधिवेशनापूर्वी निदान एक महिना स्वागतमंडळाकडे आले पाहिजेत. स्वागतमंडळाने सर्व ठरावांची एकेक प्रत म. सा. प. च्या कार्यालयाकडे अधिवेशनापूर्वी निदान पंधरा दिवस आधी पाठवावी.

(४) विषय नियामक मंडळ—संमेलनापुढे यावयाचे ठराव व उपसूचना विषयनियामक मंडळापुढे आली पाहिजेत.

विषय नियामक मंडळाचे घटक—१. म. सा. प. चे भूतपूर्व अध्यक्ष; २. म. सा. सं. चे भूतपूर्व अध्यक्ष; ३. त्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष; ४. त्या संमेलनाचे अध्यक्ष; ५. म. सा. प. च्या नियामक मंडळाचे संमेलनाचे प्रतिनिधी झालेले सभासद; ६. स्वागत मंडळाचे सर्व पदाधिकारी; ७. स्वागत मंडळाचे सभासद व प्रतिनिधी (स्थानिक) यांतून निवडलेले २५ पर्यंत प्रतिनिधी; ८. उपस्थित असलेल्या स्थानिकेतर प्रतिनिधींतून प्रत्येक म. सा. प. च्या विभागाप्रमाणे त्या त्या प्रतिनिधींनी निवडून दिलेले प्रतिनिधी.

**टीप**:—ही निवडणूक पुढीलप्रमाणे होईल. प्रत्येक विभागातील उपस्थित प्रतिनिधींच्या संख्येतील पहिल्या दहापर्यंत एक प्रतिनिधी. दहाहून अधिक सभासद उपस्थित असल्यास प्रत्येक पूर्ण दहा संख्येच्या हजर असलेल्या सभासदांच्या मागे आणखी एक.

येणेप्रमाणे विषयनियामक मंडळ सिद्ध करण्यात यावे. विषयनियामक मंडळात तीनपंचमांश मतांनी नामंजूर झालेला ठराव किंवा उपसूचना संमेलनाच्या खुल्या अधिवेशनापुढे येऊ शकणार नाहीत. परंतु तीनपंचमांशाहून कमी बहुमतांनी नामंजूर झालेले ठराव किंवा उपसूचना खुल्या अधिवेशनापुढे मांडावयाचे असल्यास विषयनियामकमंडळातील २० सभासदांच्या किंवा संमेलनाच्या ४० प्रतिनिधींच्या सह्यांनिशी तशी लेखी सूचना मंडळाच्या त्या बैठकीनंतर होणाऱ्या खुल्या अधिवेशनाच्या सुरवातीला अध्यक्षांकडे आल्यास ती खुल्या अधिवेशनात सादर केली जाईल. खुल्या अधिवेशनापुढे यावयाचे ठराव व त्याचे सूचक व अनुमोदक मुक्रर करणे इत्यादी कामे करण्याचा अधिकार विषयनियामकमंडळाकडे राहील.

(५) ठराव मंजुरी—म. सा. संमेलनात मंजूर झालेल्या ठरावांची अधिकृत प्रत संमेलनाच्या अध्यक्षांच्या सहीने म. सा. प. च्या चिटणिसांकडे पाठविली पाहिजे. त्या ठरावांची अंमलबजावणी परिषद् करील.

(अ) संमेलनाच्या कोणत्याही ठरावाची अंमलबजावणी करण्यासाठी विशेष खर्च लागणार असल्यास त्याची तरतूद संमेलनाने करावी.

(आ) परिषदेच्या सर्व साधारण धोरणाशी विसंगत म्हणून संमेलनाच्या एखाद्या ठरावाची अंमलबजावणी करता न आल्यास तसे परिषदेने पुढील संमेलनास कळवावे.

(इ) मागील संमेलनात पास झालेल्या ठरावांची अंमलबजावणी काय केली याचा अहवाल दर संमेलनात परिषदेने सादर करावा.

(६) प्रास्ताविक काम—साहित्य संमेलनाचे प्रास्ताविक काम स्वागताध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली सुरू होईल. प्रास्ताविक काम संपल्यावर संमेलनाचे नियोजित अध्यक्ष स्थानापन्न होऊन पुढील काम त्यांच्या अध्यक्षतेखाली चालवावे.

(७) अध्यक्षीय निर्णय—म. सा. संमेलनाच्या कोणत्याही कामकाजासंबंधी कसलीही अडचण उत्पन्न झाल्यास किंवा कोणत्याही नियमाच्या अर्थासंबंधी अगर कामाच्या व्यवस्थेसंबंधी प्रश्न उद्भवल्यास म. सा. प. च्या अध्यक्षांचा निर्णय बंधनकारक समजण्यात येईल. कोणत्याही अधिवेशनापुढे आलेल्या सर्व ठरावांचा निकाल उपस्थित प्रतिनिधींच्या बहुमताने होईल. एखाद्या ठरावावर दोन्ही बाजूंस सारखी मते पडल्यास त्याचा निकाल बैठकीच्या अध्यक्षांच्या निर्णायक मताने होईल.

(८) इतिवृत्त, हिशेब वगैरे—(अ) संमेलनाचे काम संपल्यावर व तत्संबंधी इतिवृत्त व हिशेब पुरे झाल्यावर संमेलनाचे सर्व दप्तर स्वा. मं. ने म. सा. प. कडे पाठवावे.

(आ) संमेलनाच्या अधिवेशनानंतर सहा महिन्यांच्या आत संमेलनाचा वृत्तान्त तयार करून अधिवेशनाच्या सर्व प्रतिनिधींकडे पाठविण्याची व्यवस्था स्वा. मं. ने करावी. वरील वृत्तान्त छापून वाटण्यासंबंधीचा सर्व खर्च करण्याची जबाबदारी स्वा. मं. वर राहील.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(इ) साहित्यसंमेलनाचे सर्व कार्य पार पाडण्यासाठी संमेलनाचे प्रतिनिधी व स्वागत मंडळाचे सभासद यांच्या वर्गणीतून रुपयास एक आणा याप्रमाणे जमा होणारी रक्कम संमेलन संपल्यापासून दोन महिन्यांच्या आत स्वा. मं. ने म. सा. परिषदेस द्यावयाची आहे.

**४७. संलग्न संस्था मान्यता** :—(अ) महाराष्ट्र–साहित्य–परिषदेचे उद्देश मान्य असणाऱ्या व परिषदेच्या कार्याशी सहानुभूती असणाऱ्या अशा वाङ्मयविषयक संस्था, संलग्न संस्था म्हणून परिषदेशी जोडून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाचा राहील. ह्या संस्था जोडून घेण्यासंबंधी अटी, नियम वगैरे करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे

(आ) साहित्याच्या उन्नतीसाठी स्थापन झालेल्या ज्या संस्थांना महाराष्ट्र–साहित्य परिषदेचे हेतू व नियम मान्य असतील, व ज्यांचे हेतू परिषदेच्या हेतूंशी विसंगत नसतील, अशा संस्थांना त्यांच्याकडून मागणी आल्यास संलग्न संस्था म्हणून जोडून घेण्यात येईल.

(इ) संलग्न संस्थांनी नोंदणी-आकार पाच रुपये द्यावा व पुढे दरवर्षी पाच रुपये वर्गणी द्यावी.

(ई) प्रत्येक संलग्न संस्थेला परिषदेच्या उद्देशांस अनुसरून कार्यकारी मंडळाला सूचना करण्याचा हक्क आहे व कार्यकारी मंडळाने त्याचा विचार करून आपला निर्णय करावा.

(उ) संलग्न संस्था नोंदून घेण्याचा अधिकार महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळास आहे; मात्र अशा संस्था पटावरून कमी करणे झाल्यास त्यासंबंधीचा ठराव कार्यकारी मंडळाने नियामक मंडळाच्या सभेपुढे मंजुरीसाठी ठेवला पाहिजे.

(ऊ) संलग्न संस्थांची अंतर्गत व्यवस्था व आर्थिक परिस्थिती यांची जबाबदारी परिषदेवर कोणत्याही प्रकारे राहणार नाही; मात्र संलग्न संस्थेने आपला छापील अथवा हस्तलिखित वार्षिक अहवाल परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडे पाठवावा.

(ऋ) प्रत्येक संलग्न संस्थेने आपल्यातर्फे आगाऊ नोंदलेला एक प्रतिनिधी परिषदेचा नियम ६ (७) वर्गाचा त्या संस्थेतर्फे सभासद गणला जाईल.

(ए) साहित्यपत्रिकेची एक प्रत प्रत्येक संलग्न संस्थेस फुकट दिली जाईल.

**४८. शाखासभा स्थापणे वगैरे**:– (१) नियम ३ 'आ' मध्ये सांगितल्याप्रमाणे निरनिराळ्या विभागाच्या मुख्य स्थानी परिषदेच्या शाखासभा स्थापन करण्याचा प्रयत्न कार्यकारी मंडळाने करावा.

(२) त्या त्या विभागातील परिषदेचे सभासद त्या शाखासभेचे सभासद राहतील. त्यांतील सर्व प्रकारच्या सभासदांच्या रोख वर्गणीपैकी एकतृतीयांश रक्कम परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडून सभेस तिचे कार्य चालविण्याकरिता देण्यात यावी.

(३) शाखासभेने आपल्या कार्यांकरिता विशेष देणग्या वगैरे मिळविल्यास त्यातील एकतृतीयांश भाग परिषदेच्या खर्चाकरिता म्हणून मुख्य कचेरीकडे पाठवावा.

(४) शाखासभेने नियुक्त केलेले दोन सभासद व कार्यकारी मंडळाचे दोन सभासद यांनी मिळून शाखासभेची घटना, परिषदेच्या घटनेस अविरोधी अशी तयार करावी.

(५) शाखासभेने आपले कार्य सर्वसाधारणपणे कार्यकारी मंडळाच्या देखरेखीखाली करावे. कार्यकारी मंडळाने काही विशिष्ट कार्ये तिजकडे सोपविल्यास तीही करावी आणि विभागीय संमेलने शक्य तो दरवर्षी भरविण्याचा प्रयत्न करावा.

(६) ज्या विभागात शाखासभा असेल तेथील नियामक मंडळाच्या निवडणुकी शाखासभेनेच कराव्या. निवडणुकीबाबत तक्रार उपस्थित झाल्यास तिचा निकाल परिषदेच्या अध्यक्षांनी करावा व तो अखेरचा मानला जावा.

(७) शाखासभेने नियामक मंडळाचे सर्व आदेश मान्य केले पाहिजेत.

(८) रु. ५०० पेक्षा अधिक अशी कोणत्याही प्रकारची आर्थिक जबाबदारी म. सा. प. कार्यकारी मंडळाच्या लेखी संमतीविना शाखासभेस अंगावर घेता येणार नाही.

(९) शाखासभेच्या कारभाराची चौकशी करण्याचा नियामक मंडळास अधिकार आहे व तशी चौकशी करण्याची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचायचे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

जबाबदारीही नियामक मंडळावर राहील. या चौकशीच्या कामी नियामक मंडळ मागेल ती माहिती शाखासभेने दिली पाहिजे; शाखासभेने आपले हिशेब व दप्तर व्यवस्थित ठेविले पाहिजे; शाखासभेचा कारभार असमाधानकारक होत असल्याचे आढळून आल्यास शाखासभेचे म्हणणे ऐकून शाखासभेची मान्यता रद्द करण्याची शिफारस नियामक मंडळाने साधारण सभेस करावी.

(१०) शाखासभेचा अध्यक्ष हा म. सा. परिषदेच्या नियामक मंडळावर पदसिद्ध सभासद होईल. सभासदांच्या १५ च्या संपूर्ण गटाला १ इतके सभासद शाखासभेने नियामक मंडळासाठी निवडून द्यावयाचे आहेत. (सांप्रत असलेल्या शाखासभा एक होईपावेतो आहेत तशाच राहतील व जेथे एका गटात दोन किंवा अधिक शाखासभा असतील तेथे अध्यक्षाबद्दलचे सभासदत्व त्यांना पाळीपाळीने दिले जाईल.)

४९. **सभावृत्तान्त पुस्तकः**– परिषदेच्या नियामक मंडळाच्या, कार्यकारी मंडळाच्या, इतर व विशिष्ट सभांच्या कामांची नोंद स्वतंत्र पुस्तकात लिहून ती त्या त्या सभांच्या पुढील बैठकीत मंजूर झाली पाहिजे.

५०. **दप्तरः**– परिषदेचे सर्व दप्तर, पत्रव्यवहार व निरनिराळ्या सभांच्या वृत्तान्तांची पुस्तके ही सर्व सुरक्षित व व्यवस्थित ठेवण्याची जबाबदारी चिटणिसांवर राहील.

५१. **घटनाबदलः**– (अ) परिषदेच्या घटनेत फेरफार करणे झाल्यास घटना दुरुस्ती कार्यकारी मंडळ व नियामक मंडळ यांच्यापुढे प्रथम विचारार्थ येऊन ती एक महिन्याची पूर्वसूचना देऊन परिषदेच्या वार्षिक सभेत किंवा त्यासाठी बोलविलेल्या विशेष सभेत हजर असून मते देणाऱ्या सभासदांच्या तीनपंचमांश बहुमताने करता येईल. याशिवाय जेथे विशिष्ट बहुमतांचा निर्देश केला नाही, अशा सर्व कामांचा विचार साध्या बहुमताने होईल.

(आ) साधारण सभेत तीनपंचमांश बहुमताने जे ठराव मान्य होतील त्यांस कोणत्याही तऱ्हेने विरोध येईल असे ठराव सहा महिनेपर्यंत पुढे आणले जाऊ नयेत.

(इ) कोणताही ठराव मान्य झाल्यापासून तीन महिने पूर्ण होण्याच्या आत त्या ठरावाला विरोधक असा दुसरा कोणताही ठराव पुढे आणता येणार नाही.

५२. **पोटनियमः**––परिषदेची कामे होण्याकरिता तिचे हेतू व नियम यांना अविरोधी असे पोटनियम कार्यकारी मंडळाने व नियामक मंडळाने जरूर वाटल्यास करावे; मात्र त्यांना परिषदेच्या पुढील साधारण सभेची संमती घेतली पाहिजे.

५३. **प्रकाशनः**––(अ) परिषदेने जे निबंध, लेख, पुस्तके यांस इनाम दिले असेल किंवा त्यांच्या प्रकाशनाचा खर्च केला असेल, त्यांची निदान एकेक प्रत सभासदांस सवलतीच्या दराने मिळावी. हे दर कार्यकारी मंडळ ठरवील.

(आ) परिषदेच्या प्रत्येक सभासदास साहित्य पत्रिकेची एक प्रत फुकट पाठविण्यात येईल.

५४. **सभासदाची रिकामी जागा भरणे**:––कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ अथवा कोणतीही समिती यांतील सभासदांची जागा कोणत्याही कारणाने रिकामी असल्यास त्या मंडळाला किंवा समितीला बहुमताने परिषदेच्या सभासदांतून निवड करून ती भरता येईल.

५५. **मंडळातील सभासदत्व रद्द करणे**:—योग्य कारण न कळविता नियामक मंडळ, कार्यकारी मंडळ व कोणतीही पोटसमिती यांच्या तीन सभांस लागोपाठ अनुपस्थित राहणाऱ्या सभासदांचे त्या त्या समितीचे सभासदत्व त्या त्या समितीने रद्द केल्यावर ते रद्द झाले असे समजण्यात यावे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

# प्रकाशने



| | | |
|---|---|---|
| १ | **मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास** (मानभाव अखेर)<br>कै. वा. अ. भिडे | |
| २ | **म. सा. परिषद–इतिहास**<br>द. वा. पोतदार | ३·०० |
| ३ | **द्रौपदीस्वयंवर** (अवचितसुत-काशीकृत)<br>संपादक–वा. दा. गोखले | ५·०० |
| ४ | **संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती** (द्वितीयावृत्ती)<br>गं. बा. सरदार | ३·०० |
| ५ | **शास्त्रीय परिभाषा कोष**<br>संपादक–आपटे व जोशी | ६·०० |
| ६ | **वाङ्मयीन वाद** (पुरस्कृत) | ३·०० |
| ७ | **सारस्वत प्रवेश** (प्रथमा परीक्षेकरिता) | २·०० |
| ८ | **साहित्यसुगंध** (प्रवेश परीक्षेकरिता) | ३·५० |
| ९ | **निबंधविकास** (प्राज्ञ परीक्षेकरिता) | २·५० |
| १० | **लेखनविषयक नियम** (मराठी साहित्य महामंडळ) | ०·१५ |

क्र. ४ व ६ या पुस्तकांची मागणी अनुक्रमे मॉडर्न बुक डेपो, पुणे २. व प्रसाद प्रकाशन, पुणे २ यांच्याकडे करावी. इतर मागणी वगैरे खालील पत्त्यावर करावी.

चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे २.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



# योग्य मेट्रिक परिमाणांत खरेदीविक्री करा

बहुधा जुन्यां वजनांचे मेट्रीक वजनामध्ये सरळ रुपांतर करून वस्तु मागितल्या जातात. उदाहरणार्थ पावशेराकरिता २३३ ग्राम मागितले जातात, तसेंच १ रत्तलाकरिता ४५४ ग्राम मागितले जातात. अशा तऱ्हेनें वस्तु मागणें हे दशमान पद्धतीच्या तत्वानुसार नाही. शिवाय यामुळें जुन्या पद्धतीप्रमाणेच आपणांस किचकट हिशोब करावा लागतो, परंतु दशमान पद्धतीचा एक मुख्य हेतु अशा तऱ्हेची क्लिष्ट आंकडेमोड दूर करणें हा आहे.

वरील उदाहरणांत वस्तु मागण्याची योग्य पद्धत म्हणजे २५० ग्राम, ३०० ग्राम, ४०० ग्राम अगर ५०० ग्राम मागणें

| पूर्वी या मापानें घेत असाल | तर आतां मागा |
|---|---|
| १ औंस (= २८ ग्राम) | ३० ग्राम |
| १ पौंड (= ४५४ ग्राम) | ५०० ग्राम |
| २ पौंड (= ९०७ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| ७ पौंड (= ३.१७ किलोग्राम) | ३ किलोग्राम |
| १४ पौंड वा स्टोन (= ६.३५ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| २८ पौंड (= १२.७० किलोग्राम) | १० किलोग्राम |
| ५६ पौंड (= २५.४० किलोग्राम) | २० किलोग्राम |
| ११२ पौंड वा हंड्रेडवेट (= ५१ किलोग्राम) | ५० किलोग्राम |
| १ टन (= १०१६ किलोग्राम) | १००० किलोग्राम |
| १ तोळा (= ११.६६ ग्राम) | १० ग्राम |
| १/१६ शेर वा छटाक (= ५८ ग्राम) | ५० ग्राम |
| १/४ शेर वा पाव (= २३३ ग्राम) | २०० ग्राम |
| १/२ शेर (= ४६७ ग्राम) | ५०० ग्राम |
| १ शेर (= ९३३ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| २.१/२ शेर (= २.३३ किलोग्राम) | २ किलोग्राम |
| ५ शेर (= ४.६६ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| १० शेर (= ९.३३ किलोग्राम) | १० किलोग्राम |
| २० शेर (= १८.६६ किलोग्राम) | २० किलोग्राम |
| १ मण (= ३७ किलोग्राम) | ४० किलोग्राम |
| २.१/२ मण (= ९३ किलोग्राम) | १ क्विंटल (१०० किलोग्राम) |



योग्य रीतीनें मेट्रिक पद्धतीचा अवलंब करा

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई

मुद्रक : श्री. वि. ग. माटे, विश्वकर्मा मुद्रणालय, ३९५ टिळकरस्ता, पुणे २
प्रकाशक : श्री. वि. त्र्यं. शेटे, चिटणीस म. सा. परिषद, टिळकरस्ता, पुणे २

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३७ : अंक १४८, जानेवारी ते मार्च १९६४

संपादक

प्रा. श्री. के. क्षीरसागर

## या अंकात

श्री. वि. स. खांडेकर, प्रा. श्री. के. क्षी., प्रा. के. पं. मंगळवेढेकर, श्री. म. वि. जोशी, श्री. य. रा. दाते, डॉ. ना. ग. जोशी, सौ. सुहासिनी लद्दू, कै. शि. म. परांजपे व एक समालोचक (श्री. बाळाचार्य खुपेरकर) यांचे लेख.

श्री. राजेंद्र वनहट्टी, प्रा. र. रा. गोसावी, डॉ. न. का. घारपुरे यांची परीक्षणे, इतिवृत्त व हिशेबपत्रके वगैरे.

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद, पुणे २

## कार्यकारी मंडळ

( १९६४–६७ )

**कार्याध्यक्ष**—श्री. के. नारायण काळे, पुणे ४
**खजिनदार**—प्रा. डॉ. न. का. घारपुरे, पुणे २
**चिटणीस**—श्री. वि. त्र्यं. शेटे, पुणे २
प्रा. अ. गं. मंगरूळकर, पुणे २
प्रा. म. ना. अदवंत, जळगाव
**'पत्रिका' संपादक**—प्रा. श्री. के. क्षीरसागर, पुणे २
**इतर सभासद** — प्रा. चंद्रकुमार डांगे, पुणे २
प्रा. भीमराव कुलकर्णी, पुणे २
डॉ. सरोजिनी बाबर, पुणे २
श्री. वा. रा. ढवळे, मुंबई २
प्रा. भ. श्री. पंडित, नागपूर
प्रा. ह. श्री. शेणोलीकर, धुळे
प्रा. कृ. ब. निकुंब, बेळगाव
श्री. वा. रं. सुंठणकर, बेळगाव
श्री. सय्यद अमीन, सांगली

म. सा. प.च्या कार्यकारी मंडळाने सन १९६४ ते १९६७ या अवधीसाठी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेकरता घटनेनुसार पुढीलप्रमाणे संपादकमंडळ नियुक्त केले आहे.

(१) प्रा. श्री. के. क्षीरसागर (संपादक)
(२) प्रा. कृ. ब. निकुंब
(३) श्री. वि. त्र्यं. शेटे
(४) प्रा. चंद्रकुमार डांगे
(५) प्रा. भीमराव कुलकर्णी

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


**सूचना**— प्रस्तुत अंकात इतिवृत्ताबरोबर नियामक मंडळ व वार्षिक सभा यांची सूचना छापलेली आहे.

— चिटणीस



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३७ : अंक १४८ जानेवारी ते मार्च १९६४

संपादक : प्रा. श्री. के. क्षीरसागर

संपादकमंडळ

प्रा. कृ. ब. निकुंब
प्रा. चंद्रकुमार डांगे
प्रा. भीमराव कुलकर्णी
श्री. वि. त्र्यं. शेटे
(चिटणीस प्रतिनिधी)

## संपादकीय

### नव्या कार्यकारी मंडळाचे स्वागत

पत्रिकेचा मागील अंक निघाल्यानंतर कार्यकारी मंडळाच्या व पदाधिकाऱ्यांच्या निवडणुका झाल्याने, परिषदेच्या कारभारी मंडळात थोडे-फार बदल झालेले आहेत. कार्याध्यक्षपदासाठी श्री. के. नारायण काळे यांचे एकच नाव सुचविले गेले होते; अर्थात ते बिनविरोध निवडून आले. नाट्य आणि साहित्यमीमांसा यांच्या बाबतीत स्वतंत्र विचार करणारे साहित्यिक म्हणून श्री. काळे यांचा लौकिक असल्याने त्यांच्या मार्गदर्शनामुळे परिषदेच्या कार्यकारी मंडळाला फार फायदा होईल यात शंका नाही. त्यांच्याप्रमाणेच डॉ. न. का. घारपुरे हेही खजिनदार म्हणून बिनविरोध निवडून आले. डॉ. घारपुरे आधी या पदावर होतेच; त्यामुळे तर त्यांचे अभिनंदन करणे विशेषच युक्त होईल.

पुण्यातर्फे सभासद म्हणून निवडून आलेल्या मंडळींत दोन नावे नवीन आहेत. एक प्रा. भीमराव कुलकर्णी व दुसरे प्रा. श्री. के. क्षीरसागर. श्री. कुलकर्णी हे परिषदेच्या कारभारात नव्यानेच येत असल्याने त्यांचे विशेष अभिनंदन करणे जरूर आहे. याखेरीज श्री. शेटे, प्रा. मंगरूळकर व प्रा. डांगे हे आधीच कार्यकारी मंडळात असलेले सभासद फिरून निवडून आल्याने अभिनंदनास पात्र आहेत.

पुण्याबाहेरील सभासदांत प्रा. शेणोलीकर व प्रा. भ. श्री. पंडित हे दोघे नव्याने निवडून येत आहेत. या उभयतांचे आम्ही मनःपूर्वक स्वागत करतो. श्री. मुठणकर, प्रा. अदवन्त, प्रा. निकुम्ब व श्री. वा. रा. ढवळे हे जुने सभासद फिरून निवडून आल्याबद्दल अभिनंदनास पात्र आहेत. परिषदेचे प्रादेशिक अधिकारक्षेत्र महामंडळाच्या स्थापनेनंतर बरेच कमी झालेले असूनही, प्रा. पंडित व श्री. ढवळे यांच्यासारख्या, नागपूर व मुंबई विभागातील ज्येष्ठ कार्यकर्त्यांना परिषदेच्या सभासदांनी निवडून दिल्याने, परिषदेचे अखिल महाराष्ट्रीय स्वरूप टिकण्यास मदत होईल, अशी आम्हांस आशा आहे.

नव्या कार्यकारी मंडळाच्या ता. १२ एप्रिल रोजी भरलेल्या पहिल्या बैठकीत घटनेप्रमाणे जे दोन सभासद नियुक्त करण्यात आले ते तर विशेषच उल्लेखनीय आहेत. आज मराठी साहित्यात पुरुषांच्या बरोबरीने स्त्रिया चमकत असूनही, परिषदेच्या कारभारात मात्र स्त्रिया अभावाने तळपाव्या, हे अनेकांना एक कोडेच वाटे. डॉ. कु. सरोजिनी बाबर यांना कार्यकारी मंडळावर नियुक्त केल्याने ही उणीव भरून निघेल यात शंका नाही. डॉ. सरोजिनी बाबर यांनी लोकवाङ्मयाच्या क्षेत्रात जी बहुमोल कामगिरी केली आहे, तिचे वाङ्मयीन आणि सामाजिक महत्त्व फार मोठे आहे.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



परिषदेच्या कार्यात कु. बाबर यांच्या बहुमोल सल्ल्यांचे महत्त्व विशेष राहील यात शंका नाही.

नियुक्त झालेले दुसरे सभासद म्हणजे सांगली येथील सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. सय्यद अमीन हे होत. त्यांनी लिहिलेल्या 'हजरत महंमद पैगंबर' यांच्या चरित्रामुळे, त्यांचे नाव मराठी वाचकांना प्रथम परिचयाचे झाले. त्यांचे अगदी अलीकडचे पुस्तक 'अकबर', हे सुंदर सफाईदार भाषाशैली आणि विपुल ऐतिहासिक आधार या दोन्ही दृष्टींनी अर्वाचीन मराठी वाङ्मयातील उत्तमांतील उत्तम ग्रंथांत मोडेल. या ग्रंथाकडे आपल्या सरकारी-बिनसरकारी साहित्य परामर्श-मंडळाचे जावे तेवढे लक्ष गेले नाही, ही दुर्दैवाचीच गोष्ट म्हटली पाहिजे. श्री. सय्यद अमीन व कु. सरोजिनी बाबर यांच्या निवडीमुळे कार्यकारी मंडळाच्या सल्लामसलतीत काही नवे विचारप्रवाह येऊन मिसळतील अशी आशा आहे.

## काही जुन्या सभासदांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण

निवडणूक म्हटल्यावर नव्या सभासदांच्या नव्या संपर्क-लाभाप्रमाणेच काही जुन्या सभासदांचा संपर्क तुटणेही अटळच असते. या दृष्टीने गेल्या कार्यकारी मंडळातील आमचे मित्र श्री. दि. के. बेडेकर यांची अनुपस्थिती आम्हांला सर्वांत अधिक जाणवेल. पानशेत पुराचे वेळी पूरग्रस्त लेखकांना साहित्य-संस्कृतिमंडळ व 'कल्चरल् फ्रीडम् असोसिएशन' या संस्थांच्यामार्फत जी मदत मिळाली, तिचे पुष्कळसे श्रेय श्री. दि. के. बेडेकर यांच्या तत्परतेला आणि परिश्रमांना आहे. डॉ. केतकर यांचे जुने समाधिस्थान महापुराच्या भक्ष्यस्थानी पडले आहे असे समजताच, प्रायः दुर्गम झालेल्या त्या भागात जातीने जाऊन, चिखल मातीतून त्यांच्या अस्थी हस्तगत करण्याचे कार्य श्री. बेडेकर यांनी केले नसते, तर केवळ अनास्थेमुळे आपण या पवित्र ठेव्याला मुकलो असतो. आधुनिक काळात वाङ्मयकार्याचे धागे समाजाच्या व राज्यसंस्थेच्या कोणकोणत्या कोपऱ्यापर्यंत पोहोचतात, याची नागरूक जाणीव ठेवण्यात बेडेकर जसे दक्ष होते, तसेच परस्परविरुद्ध स्वभावाच्या व्यक्तींचे आणि संस्थांचे सहकार्य मिळविण्यातही त्यांचा हातखंडा होता. अशा दक्ष आणि सहकार्यकुशल सदस्याची अनुपस्थिती चालू कार्यकारी मंडळाला सतत जाणवेल, यात शंका नाही. श्री. भगवन्तराव देशमुख व श्री. वि. म. कुलकर्णी यांच्यासारख्या विद्वान तरुण कार्यकर्त्यांची अनुपस्थितीही कार्यकारी मंडळाला जाणवेल. नागपूरचे श्री. सगदेव हे आपल्या स्नेहाळ व्यक्तिमत्त्वाने कार्यकारी मंडळात खेळीमेळीचे वातावरण उत्पन्न करीत. त्यांचेही स्मरण सर्वांना झाल्याखेरीज राहणार नाही. अर्थात बदलत्या निवडीने कर्तृत्वाचे पाणी खेळते राहणे, हा लोकशाही कार्यपद्धतीचा आत्मा आहे. या दृष्टीने या सर्व बदलांचा आपण सानंद स्वीकार केला पाहिजे.

## जगत्कवीची चतुर्थ जन्मशताब्दी

चालू वर्ष हे सर्व जगभर महाकवी शेक्सपियर यांच्या चतुर्थ जन्मशताब्दीचे वर्ष म्हणून साजरे केले जाईल. भारतातही वेगवेगळ्या प्रांतांत या निमित्ताने शेक्सपियरच्या चरित्राचे व वाङ्मयाचे स्मरण केले जाईल. इंग्रजी अमलाबरोबर भारतातील सर्वच भाषांशी इंग्रजी वाङ्मयाचा व इंग्रजीच्या द्वारे सर्वच पाश्चात्त्य वाङ्मयाचा संपर्क घडून आला. तथापि महाकवी शेक्सपियर आणि आधुनिक मराठी रंगभूमी यांचा संबंध या सर्वसामान्य वाङ्मयीन संबंधापेक्षा फारच घनिष्ठ आहे. या वाङ्मयीन संपर्काची पहिली सूत्रे जरी विद्यापीठातील इंग्रजीच्या प्राध्यापकांनी हालविली असली, तरी शेक्सपियरच्या महाराष्ट्रातील पुढच्या प्रवासाशी, विद्यापीठातील विद्वानांचा फारच कमी संबंध होता. या अलौकिक नाटककाराला सामान्य रसिकापर्यंत पोहोचविण्याचे कार्य महाराष्ट्रातील एका अल्पशिक्षित नटाने केले, हा योगायोग एका दृष्टीने फार अर्थपूर्ण आहे. कारण स्वतः शेक्सपियर हाही नटवर्य गणपतराव जोशी यांच्याप्रमाणेच अल्पशिक्षित होता, व नटही होता!

अनेक दृष्टींनी अद्वितीय असे शेक्सपियरचे हॅम्लेट हे नाटक महाराष्ट्रात इंग्रजीचा गंधही नाही अशा प्रेक्षकांपर्यंत नेऊन पोहोचविण्याचे कार्य गणपतराव जोशी यांच्या असाधारण अभिनयकौशल्यानेच केले. तथापि हॅम्लेटप्रमाणेच मॅक्बेथ या नाटकाचे मराठी रूपान्तरही गणपतराव जोशी यांनी रंगभूमीवर आणले होते. पण मराठी प्रेक्षकांच्या हृदयात 'हॅम्लेट' जे स्थान घेऊ शकले, ते स्थान शेक्सपियरची इतर नाटके घेऊ शकली नाहीत. मॅक्बेथच्या रूपान्तरात स्वतः गणपतराव जोशीच नाटकाचे काम करीत असत, पण हॅम्लेटइतके ते नाटक लोकप्रिय होऊ शकले नाही, याला कारण हॅम्लेट या नाटकाचे असामान्यत्वच होय. काव्यमय संभाषणे आणि मानवी स्वभावावर आधारलेला शोकान्त, या दोहोंबद्दल शेक्सपियर याची कितीही ख्याती असली, तरी एवढ्या दोहोंवर तो सामान्य

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचाल तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

जनांना प्रिय झाला असता की नाही याची शंकाच आहे. सामान्य व्यक्तींची वैचित्र्यपूर्ण आणि सहानुभूतिपूर्ण चित्रे हे शेक्सपियर याचे तेवढेच मोठे वैशिष्ट्य आहे, असे आम्ही समजतो. निदान मराठी रंगभूमीला शेक्सपियरच्या या वैशिष्ट्याचे जेवढे महत्त्व होते, तेवढे त्याच्या काव्यमयतेचे आणि उदात्त गंभीर जीवितचित्राचे नव्हते, असे एका अर्थाने म्हणता येईल. जीवितातील दुःखांच्या आणि गांभीर्याच्या चित्रणात शेक्सपियर हा जितका निपुण आहे, तितकाच तो जीविताची हास्यमय बाजू रंगवण्यातही निपुण आहे. हॅम्लेट, मॅक्बेथ, ऑथेल्लो यांच्यासारखी गंभीर, उत्कट आणि कठोर निश्चयी माणसे रंगवण्यात शेक्सपियर जितका तल्लीन होतो, तितकाच तो फॉल्स्टाफसारखी हास्यकारक पात्रे रंगविण्यातही तल्लीन होतो. राजे, राण्या, ड्यूक्स आणि डचेसेस् यांची चित्रे तो जितक्या कौशल्याने काढतो, तितक्याच कौशल्याने व आकर्षकतेने तो सामान्य नोकराचाकरांचीही चित्रे काढतो. आणि सर्वांत विशेष म्हणजे त्याच्या सदतीस नाटकांत मिळून येऊन गेलेल्या शेकडो लहानमोठ्या पात्रांतून एकसारखे दुसरे पात्र काढून दाखविता येणार नाही.

## मराठी रंगभूमीवरील शेक्सपियर

कोणत्याही पाश्चात्त्य लेखकाचा जेवढा अभ्यास महाराष्ट्रात झाला नसेल, तेवढा शेक्सपियरचा झाला असला तरी महाराष्ट्राला अद्यापही शेक्सपियरचा सम्यक परिचय होण्याला जागा आहे असे म्हणावेसे वाटते. विद्यापीठाच्या द्वारे शेक्सपियरचा मराठी वाचकांशी व प्रेक्षकांशी पहिला परिचय झाला, हे वर सांगितलेच आहे. पण विद्यापीठातील पंडितांनी आरंभिलेले कार्य कुशल नटांनी हाती घेतल्यानंतरही या परिचयकार्यात थोडीफार एकदेशीयता राहिली. हॅम्लेट व ऑथेल्लो यांचे नाव सर्वसामान्य मराठी रसिकांना माहीत आहे; परंतु आमच्या मते फॉल्स्टाफ हे नावही शेक्सपियरच्या कल्पनासृष्टीत तितकेच अविस्मरणीय आहे, परंतु हे पात्र शेक्सपियरच्या ऐतिहासिक नाटकात येऊन गेल्याने पदवीधरांनाही ते फारसे माहीत नसते. शेक्सपियर याची कोणती नाटके वाङ्मय, रंगभूमी आणि तत्त्वज्ञान यांच्या दृष्टीने श्रेष्ठ, हा प्रश्न अभ्यासू पंडितांच्या दृष्टीने महत्त्वाचा असेल. परंतु त्याची कोणती नाटके मराठी वेशात मराठी रसिकांना रुचतील हाही प्रश्न तितकाच महत्त्वाचा आहे. आमच्या मते शेक्सपियरच्या ऐतिहासिक नाटकांकडे महाराष्ट्रातील विद्वानांनी, नटांनी आणि रसिकांनी त्यातल्या त्यात अधिक दुर्लक्ष केले आहे. परकीय देशाच्या इतिहासावर आधारलेले कथानक आपल्या देशाच्या वातावरणाला जुळणे शक्य नाही, ही कल्पनाही कदाचित या दुर्लक्षाला कारणीभूत झाली असेल. तथापि एका भाषेतील काव्यमय संवाद दुसऱ्या भाषेत रूपांतरित करणे हे काम जितके अवघड, त्याहून एका देशातील ऐतिहासिक कथानक दुसऱ्या देशाच्या भाषेत रूपांतरित करणे खासच अधिक अवघड नाही. निदान या अडचणीमुळे शेक्सपियरच्या काही रमणीय नाट्यकृतींकडे दुर्लक्ष होऊ नये.

शेक्सपियरच्या चतुर्थ जन्मशताब्दीच्या निमित्ताने शेक्सपियरच्या नव्या मराठीकरणासंबंधीही काही सूचना पुढे येत आहेत; शेक्सपियरची अधिकाधिक नाटके रंगभूमीवर आणण्याच्याही सूचना पुढे येत आहेत; इतकेच नव्हे तर पदवीधरांच्या पहिल्या पिढीने, व साठ वर्षांपूर्वीच्या रंगभूमीने, शेक्सपियरच्या नाट्यसृष्टीची जेवढी दखल घेतली तेवढीही दखल आजची आपली प्रगत रंगभूमी घेत नाही याबद्दल आश्चर्यही व्यक्त करण्यात येत आहे !

## शेक्सपियर मागे पडला ?

शेक्सपियर-जन्मशताब्दीच्या निमित्ताने वरील कटु सत्याकडे लक्ष गेले, ही गोष्टही कमी नव्हे. पण या प्रश्नाचे उत्तर मात्र आपण धीटपणे दिले पाहिजे. केवळ 'दुसरे महायुद्ध', 'स्वातंत्र्य-संग्राम' इत्यादी सर्वसमावेशक घटनांचा हवाला देऊन निसटण्याचा प्रकार या बाबतीत तरी न व्हावा ! शतसांवत्सरिकाच्या भाविक वातावरणात शेक्सपियरचे गुणगान करणे सोपे आहे; परंतु आज गुणगान करणारे विद्वानही काही वर्षांमागे कित्येक वाङ्मयबाह्य गोष्टींनी इतके भारले गेले होते की, त्यांना शेक्सपियर हा एक मागासलेला व कमी प्रतीचा नाटककार वाटू लागला होता. सामाजिक प्रश्नांवरील प्रक्षोभक विचार आणि नाट्यतंत्रातील अभिनव प्रयोग यांना सुमारे पंचवीस वर्षांमागे अचानक एवढे महत्त्व प्राप्त झाले होते की, शेक्सपिअरच्या नाटकांतील नाट्यगुणांकडे, काव्यगुणांकडे आणि खोल मानसशास्त्राकडे आमचे विद्वान थोड्या अहंगंडानेच पाहू लागले होते. इब्सेनचा शोध लागल्याने आम्ही एवढे बेभान झालो होतो की, नाट्यात शेक्सपियरचे शिष्यत्व पत्करणे हे आम्ही मनातून तरी मागासलेपणाचे मानू लागलो होतो. नाट्यप्रयोगातील आणि सामाजिक दृष्टिकोणातील वास्तववादाला आणि प्रयोगशीलतेला काव्यापेक्षा आपण अधिक महत्त्व देऊ लागलो. अर्थात आपल्या या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचाल तेथे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

भारावून जाण्यात फार आश्चर्यकारक असे काही नव्हते. इंग्लंडमध्येही बर्नार्ड शॉसारखे नाटककार शेक्सपियरचा भाव ' उतरविण्यात ( Debunking मध्ये ) धन्यता मानीत होते. तंत्रनैपुण्य, प्रयोगशीलता व इब्सेन पूजन हे या काळाचे विशेष होते. या काळात ज्या एका भाषान्तरित नाटकाला नाट्यमन्वन्तर करण्याचे श्रेय देण्यात येत असे, त्या **' आंधळ्याची शाळा '** या नाटकातील एका दृश्यात—अर्थात् एका सबंध अंकात—इब्सेनचा पुतळा रंगभूमीवर ठेवलेला असे, हे त्या वेळच्या प्रेक्षकांना आजही आठवेल. अशा स्थितीत, " जेव्हा विद्यापीठे कमी होती तेव्हा शेक्सपियरचा व्यासंग महाराष्ट्रात अधिक होत असे " या गोष्टीचे या शतसांवत्सरिकाच्या निमित्ताने सखेद आश्चर्य करणे म्हणजे गेल्या तीस वर्षांच्या रंगभूमीच्या इतिहासाकडे डोळेझाक करणे होय.

## पुण्यातील शेक्सपियर-महोत्सव

वरील विचार सुचण्याचे कारण म्हणजे पुणे येथे पुणे विद्यापीठ आणि साहित्य-परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने साजऱ्या झालेल्या शेक्सपिअर-महोत्सवात अशा प्रकारचे आश्चर्य दोघा विद्वान वक्त्यांनी व्यक्त केले हे होय. इब्सेन-पूजनामुळेच शेक्सपियरचे मराठी रंगभूमीवरील माहात्म्य संपुष्टात आले, या उपपत्तीला प्रतिवाद म्हणून एका वक्त्याने " इब्सेन हा मराठी रंगभूमीवर खऱ्या अर्थाने आलाच नाही." ही भूमिका घेतली. आमच्या नाटककारांना आणि प्रयोग-निर्मात्यांना इब्सेन पूर्णपणे पचला की नाही, हा येथे मुख्य प्रश्न नसून, पुरोगामी नाट्यविषय आणि पुरोगामी नाट्य-तंत्र यांच्या माहात्म्यामुळे शेक्सपियरच्या नाट्यतंत्राचा मराठी नाटककार अधिक्षेप करू लागले की नाही, हा येथे मुख्य प्रश्न आहे. ज्या गोष्टी आपण प्रगतिकारक म्हणून पत्करल्या, व ज्या अन्य गोष्टींचा त्याग आपण प्रगतीखातरच केला, त्यांचे आपणच आश्चर्य करणे म्हणजे इतिहास विसरणे होय. शेक्सपियर शतसांवत्सरिकाच्या निमित्ताने शेक्सपियरच्या प्रयोगांकडे आणि मराठी रूपान्तरांकडे पुन्हा वळण्याचे अनेक मार्ग सांगता येतील. परंतु ते चोखाळण्या-पूर्वी आपण प्रामाणिक सिंहावलोकन व आत्मपरीक्षण करण्यास कचरता कामा नये.

## आमच्या खजिनदारांचे अभिनंदन

डॉ. न. का. घारपुरे यांचे नाव महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कचेरीशी कायमचे निगडित झाले आहे. गेली कित्येक वर्षे ते परिषदेच्या कोणत्या ना कोणत्या पदावर आहेतच. पण कोणत्याही पदावर निवडलेले असले, तरी अगत्याने व आग्रहाने परिषदेच्या प्रत्येक खात्यात आणि प्रत्येक कामात लक्ष घालणे हे त्यांचे अभिनंदनीय वैशिष्ट्य झालेले आहे. डॉ. घारपुरे हे अनेक देशी-विदेशी पदव्यांनी विभूषित ( M. A., LL. B., Ph. D. ) असे विद्वान तर आहेतच; पण उद्योगीपणा, निर्भीडपणा, कडक आवाज, या त्यांच्या वैशिष्ट्यांमुळे अनेक संस्थांच्या कारभारांत त्यांनी नाव कमावलेले आहे. परिषदेच्या आजच्या कारभारी मंडळात अनुभवाच्या दृष्टीने ते सर्वांत ज्येष्ठ आहेत.

आज डॉक्टर महाशयांचे हे सर्व आठवण्याला अनेक कारणे आहेत. पहिले कारण म्हणजे त्यांच्या वयाला मे महिन्याच्या पहिल्या तारखेस साठ वर्षे पूर्ण होऊन ते तांत्रिकदृष्ट्या सेवानिवृत्त झाले आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे युनिव्हर्सिटी ग्रँट्स् कमिशनने सेवानिवृत्त विद्वानांकरिता ठेवलेले संशोधनविषयक अनुदानही त्यांना यंदा मिळाले आहे. या दोन्हीही गोष्टींबद्दल आम्ही डॉ. घारपुरे यांचे मनापासून अभिनंदन करतो. आणखीही एक गोष्ट या प्रसंगी मनात येते. थोड्याच काळापूर्वी डॉ. घारपुरे यांना घरच्या घरी एक मोठा अपघात होऊन त्यांच्या मांडीचे हाड मोडले होते. या जिवावरच्या दुखण्यातून निभावून त्यांना सुदैवाने अधिक कार्य करण्याला संधी मिळत आहे, यामुळे तर त्यांची ही एकसष्ठी आणि त्यांना मिळालेले हे अनुदान अधिकच अभिनंदनीय आहे. आम्ही त्यांना दीर्घायुष्य चिंतितो !

## स्वतःसंबंधी

नव्या कार्यकारी मंडळाने पत्रिकेच्या मुख्य संपादकत्वाची जबाबदारी माझ्यावर सोपविली आहे. या बाबतीत मी माझ्या दृष्टीने एक अधिक उपयुक्त योजना, अर्थात एक अधिक उपयुक्त नावही, सुचविले होते. परंतु कार्यकारी मंडळाने ती योजना मान्य केली नाही. आजच्या संपादक-मंडळात अन्तर्भूत असलेले प्रा. निकुम्ब, प्रा. भीमराव कुलकर्णी, श्री. शेटये व प्रा. चंद्रकुमार डांगे यांच्या निर्भेळ सहकार्याच्या आश्वासनामुळेच मी या योजनेला अखेर सम्मती दिली आहे. पत्रिकेच्या संपादकपदावर यापूर्वी डॉ. माधवराव पटवर्धन, श्री. मो. ज्ञा. शहाणे, श्री. के. नारायण काळे, श्री. दि. के. बेडेकर यांच्यासारखी मंडळी येऊन गेली आहेत. गेले काही महिने श्री. वा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

रा. ढवळे यांनीही मोठ्या परिश्रमाने या कामातील सातत्य टिकविले.

मला आशा आहे की, माझ्या सहकारी मंडळींच्या मातबर साहाय्याच्या जोरावर साहित्यपत्रिकेचा लौकिक पूर्ववत राहील.

श्री. के. क्षी.

## हा अंक व या अंकात

वास्तविक हा अंक साहित्य-सम्मेलनापूर्वी निघावयाचा व तोही वार्षिक ' समालोचनात्मक अंक ' म्हणून निघावयाचा. समालोचनांकाची काही सिद्धता पूर्वीच्या संपादकांनी केलीही होती. परंतु यादरम्यान निवडणुका व साहित्य-संमेलन यांच्या गडबडीमुळे व इतरही काही दृष्टींनी समालोचनांक पुढे ढकलण्याचे संपादक मंडळाने ठरविले. अर्थात हा अंक नेहमीच्या स्वरूपातच निघत आहे. तथापि त्यात शेक्सपियरविषयक लिखाण अधिक येणे अपरिहार्य होते. नवे सम्मेलनाध्यक्ष कुसुमाग्रज यांच्या-संबंधी श्री. भाऊसाहेब खांडेकरांकडून मुद्दाम लिहून घेतलेला लेखही समयोचित वाटेल अशी आशा आहे. शेक्सपियरसंबंधीचा एक लेख संपादकांनीच लिहिला आहे व दुसऱ्या लेखाच्या निमित्ताने सर परशुरामभाऊ कॉलेजमधील विद्वान प्राध्यापक श्री. मंगळवेढेकर यांचा पत्रिकेशी नव्याने संबंध जडत आहे. सौ. सुहासिनी लद्दू यांचा व्याकरणविषयक लेख पत्रिकेच्या सर्वसाधारण परंपरेला धरूनच आहे. श्री. के. नारायण काळे याचा लेख अपेक्षित होता, परंतु त्यांच्या आकस्मिक आजारीपणामुळे तो येऊ शकला नाही.

—संपादक

* * *

वि. स. खांडेकर

# हिमशीतल अग्निज्वाला

माणसाप्रमाणे देशांच्या कुंडल्या मांडल्या जातात आणि त्यांची भविष्ये वर्तविली जातात. ती कितपत खरीखोटी ठरतात हे मी कधी पडताळून पाहिलेले नाही. मात्र याच पद्धतीने गावांच्या कुंडल्या मांडल्या जात असतील तर गोमंतकातल्या मडगावच्या पत्रिकेत विद्या, कला वगैरेंशी संबंध असलेले ग्रह उच्चीचे असावेत असा तर्क करायला काहीच हरकत नाही. त्यामुळेच १९३० साली मडगावला भरलेल्या मराठी साहित्य-सम्मेलनाला वामन मल्हार जोश्यांसारखा आणि यंदा तिथे भरणाऱ्या सम्मेलनाला कुसुमाग्रजांसारखा अव्वल दर्जाचा, अजातशत्रू साहित्यिक अध्यक्ष म्हणून लाभला असावा.

अजातशत्रू या विशेषणाला लौकिक व्यवहारापेक्षाही साहित्यक्षेत्रात फार महत्त्व आहे. कधीकाळी जगातले सर्व संघर्ष थांबले तरी साहित्यातील रणधुमाळी—मग ती नव्या-जुन्यांची असो, श्लील-अश्लीलांची असो अथवा अन्य कुठलीही असो—यावच्चंद्रदिवाकरौ सुरू राहील याविषयी मला संदेह नाही. दोन घड्याळांप्रमाणे दोन साहित्यिकांचेही कधी एकमत होत नसल्यामुळे या क्षेत्रात जी असंख्य थंडी युद्धे सतत धुमसत असतात त्यांची शिरगणती करणे हेसुद्धा कठीण कर्म आहे. हे सर्व लक्षात घेतले म्हणजे गेली ३० वर्षे साहित्याच्या धुमश्चक्रीत वावरूनही कुसुमाग्रजांनी आपल्या ध्वजाला धुळीचा स्पर्श होणार नाही अशा रीतीने तो कसा फडकत ठेवला याचे अनेकांना कोडे पडेल.

मात्र या कोड्याचे उत्तर तसे फारसे अवघड नाही. कुसुमाग्रजांच्या काव्यात ' अहिनकुल 'पासून ' जमीन - आगगाडी 'पर्यंत आणि ' बळी 'तल्या दुर्दैवी जीवापासून ' गर्जा जयजयकार ' मधल्या मृत्यूला खेळणे मानणाऱ्या देशभक्तापर्यंत नाना प्रकारचे संघर्ष मोठ्या रसरशीत रीतीने प्रतिबिंबित झालेले आढळतील. पण साहित्यिक या नात्याने त्यांचे जीवन शांत, संथ आणि गंभीर आहे. राजमार्गावरल्या गर्दीतही ' एकला चालो रे ' या वृत्तीने त्यांच्यातला साहित्यिक गेली अडीच तपे आपली वाटचाल करीत आला आहे. याचे कारण कुसुमाग्रजांच्या वैशिष्ट्यपूर्ण आंतरिक व्यक्तित्वात आहे. जलाशयातल्या कमलपत्राप्रमाणे ते व्यक्तित्व आहे.

याचा अर्थ कुसुमाग्रज हे हस्तिदंती मनोऱ्यात राहणारे तथाकथित कलावादी आहेत असा मात्र नाही; उलट वैयक्तिक आणि सामाजिक जीवनातल्या संघर्षांना ते



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हिरिरीने सामोरे जाणारे आहेत. अशा संघर्षात घाम, अश्रू व रक्त यांचा जो चिखल होतो त्याला नाक न मुरडता, त्यांतूनच आपली काव्यकमळे फुलविणारे कवी आहेत ते !

असे असूनही ते 'स्वान्तः सुखाय' लिहिणारे खरेखुरे कलावंत राहिले आहेत. 'विशाखे'ने त्यांना कीर्तिशिखरावर नेऊन बसविले. पण त्या उंच शिखरावर उभे राहूनही पायथ्याशी असलेल्या ज्या मातीवर त्यांचे पहिल्यापासून प्रेम आहे. तिच्यावरली त्यांची आर्द्र आणि आर्त दृष्टी कधीही क्षणभर ढळली नाही. दुसरे अधिक उंच शिखर शोधण्याकरिता ती वरच्या अनंत अवकाशाकडे कधीही वळली नाही. त्या शिखरावरच ते गात राहिले. पूर्वीच्या मुक्तपणाने मातीची गाणी आळवीत राहिले आपल्याच आनंदात मग्न होऊन !

कीर्तीपेक्षाही पैशाचा मोह हा गनिमी काव्याने जातिवंत कलावंताचा घात घेणारा शत्रू आहे. कलावंताने स्वच्छंदपणे सुंदर निर्मिती करावी आणि त्या कलाकृतीचे लाखो लोकांकडून कौतुक होऊन त्याच्या पायाशी लक्ष्मीने लोळण घ्यावी ही इष्ट अशीच गोष्ट आहे. पण असे होणे निराळे आणि कलाकाराने प्रेरणेची मान मुरगाळून दुधात पाणी मिसळून पैसा मिळवू इच्छिणाऱ्या गवळ्याप्रमाणे निःसत्त्व रचनेचे रतीब घालत सुटणे निराळे. कुसुमाग्रजांनी आपल्या कलेला हे बाजारी स्वरूप कधीही येऊ दिले नाही. त्यांच्या काही कविता सामान्य उतरल्या असतील. नाटके, कादंबऱ्यांत अपेक्षित उंची ते गाठू शकले नसतील, पण त्यांनी जे जे लिहिले ते ते आपल्या अंतरंगातल्या ऊर्मींच्या तालावर—कलावंताच्या स्वातंत्र्याचा वेदा रुपाया कधीही न मोडता.

मरगळलेल्या मराठी रंगभूमीला नाट्यमहोत्सवांच्या मार्गाने संजीवन देण्याकरिता जिवाचे रान करणाऱ्या डॉ. भालेरावांमुळे कुसुमाग्रज नाट्यक्षेत्रात आले. पण त्यांनी जी नाटके लिहिली ती आपल्या विशिष्ट प्रकृतीशी जुळतील अशी, आपली प्रतिभा ज्यांच्या चिंतनाने धुंद होईल असे विषय निवडून. इतरांच्या अथवा स्वतःच्या व्यावहारिक सोयी किंवा गरजा लक्षात घेऊन नव्हे—वेळापत्रकाप्रमाणे माल तयार करायचा म्हणूनही नव्हे. कुसुमाग्रज यांच्यातला कवी हे मोठे सुंदर आणि रंगीबेरंगी पंख असलेले फुलपाखरू आहे. पण ते स्वच्छंदी आहे. खिडकीत ठेवलेल्या कुंडीतल्या फुलाशी ते खेळत आहे म्हणून त्याला धरायला जावे तर ते भुर्रकन उडून जाईल—मग बाहेरच्या बागेतही त्याचा पत्ता लागणार नाही.

या सर्व गोष्टींमुळेच कुसुमाग्रजांच्या आंतरिक, लौकिक आणि वाङ्मयीन अशा तिन्ही प्रकारच्या व्यक्तित्वात विलक्षण सुसंगती आहे. या एकसंध व्यक्तित्वामुळे त्यांच्या काव्याचा कणा कणखर झाला आहे; सौंदर्य, सामर्थ्य आणि साधुत्व या साहित्याच्या तिन्ही प्रेरक शक्तींचे ते स्वभावतःच पूजक बनले आहेत.

कुठल्याही लौकिक गोष्टीचा त्यांना सोस नाही. ते कोणत्याही साहित्यिक कंपूचे सभासद नाहीत, कोणत्याही राजकीय पंथाचे पाईक नाहीत. माणसाची आणि माणुसकीच्या मूल्यांची ज्याने ज्याने प्रतिष्ठा वाढेल असा त्यांना विश्वास वाटतो, त्याचे त्याचे ते कैवारी आहेत. माणूस आणि माणुसकीची मूल्ये यांना पायदळी तुडविणारे जे जे जगात दिसेल त्याचे त्याचे ते वैरी आहेत.

प्रीतीपासून परमेश्वरापर्यंत आणि साडेतीन हाताच्या सापळ्याच्या पोटात आगीचा डोंब उठविणाऱ्या दारिद्र्यापासून हे सुंदर जग उद्ध्वस्त करून सोडणाऱ्या महायुद्धापर्यंत सर्व अनुभवांनी त्यांची तरल प्रतिभा प्रक्षुब्ध झाली आहे. पण या विराट प्रश्नांच्या परंपरागत उत्तरांच्या जाळ्यात ते कधीही अडकून पडले नाहीत. यामुळे जीवनाला आधारभूत असलेल्या श्रद्धा उराशी बाळगूनही ते बंडखोरीचे निशाण मोठ्या तडफेने फडकवू शकतात. काव्यप्रांतातले केशवसुतांनंतरचे बडे बंडवाले कुसुमाग्रजच होत ! मात्र मला नेहमी नवल वाटते ते एका गोष्टीचे. असे अलिप्त, स्वच्छंदी बंडखोर व्यक्तित्व असलेला हा कवी खाजगी जीवनात किती संकोची व किती विनम्र आहे. 'किनारा' या त्यांच्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत मी चार ओळीत त्यांची गडकऱ्यांशी तुलना केली होती. पण त्या चार ओळींचे कुसुमाग्रजांना मोठे ओझे वाटू लागले. त्यांनी त्या काढून टाकण्याविषयी मला गळ घातली, आणि मुद्रणयंत्रावर चढलेला फर्मा उतरवून टाकणे प्रकाशकांना भाग पडले.

अशा व्यक्तित्वातून उगम पावलेले कवित्वही तसेच आगळे होणे अपरिहार्य होते, 'विशाखा' या काव्यसंग्रहाचे पहिले नाव 'समिधा' होते. 'विशाखे'तील अनेक रसोत्कट कविता वाचल्यानंतर मला ते नाव कसेसेच वाटू लागले. मदनाच्या पुतळ्यावर अग्निहोत्री बुवांची कानटोपी चढवावी तसे. कुसुमाग्रजांनी ते नंतर बदलले. पण त्यांच्या कवित्वाची बैठक पूर्णपणे कळायला 'समिधाच सख्या या' ही 'विशाखे'तील शेवटची कविता अवश्य वाचायला हवी. या कवितेत प्रारंभीच ते म्हणतात—



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'दूरस्थ कुणी दे तुझ्या करी ही कविता
वाहते जिच्यातुनि त्याची जीवनसरिता
खळखळे, अडखळे, सुके, कधी फेसाळे
परि अखंड शोधे वाट समुद्राकरिता'

विशाल सागराच्या वाटेचा शोध हा कुसुमाग्रजांच्या प्रतिभेचा विशेष आहे, तिची धाव जे भव्य, दिव्य, उत्कट किंवा उदात्त आहे त्याच्याकडे आहे. 'पृथ्वीचे प्रेमगीत' ते लिहितात, पण त्यांची पृथ्वी ही पर्जन्याच्या प्रणयधारांनी अंग-प्रत्यंगातून वहरून जाणारी नाजूक प्रणयिनी नाही. ती सूर्याभोवती प्रदक्षिणा घालणारी आणि त्याच्या स्पर्शाने जळून जाऊन सती पार्वतीशी स्पर्धा करणारी प्रेयसी आहे. सूर्याला उद्देशून ती म्हणते—

'परि भव्य ते तेज पाहून पुजून
घेऊ गळ्याशी कसे काजवे
नको क्षुद्र शृंगार तो दुर्बळांचा
तुझी दूरता त्याहुनी साहवे'

या कविमनाला भव्यतेचे जे आकर्षण आहे त्याच्याशी सुसंगत अशी कल्पकताही त्याला लाभली आहे. या कल्पकतेची जात गरुडाची आहे, कोकिळेची नाही. केशवसुत, बी आणि सावरकर यांच्या प्रतिभेशी तिचे जवळचे नाते आहे. नाजूकसाजूक चमत्कृतीवर लुब्ध होऊन ती त्यांच्याभोवती पिंगा घालीत बसत नाही. म्हणूनच 'कोलंबसाचे गर्वगीत,' 'स्वप्नाची समाप्ती,' 'अहिनकुल,' 'गोदाकाठच्या संधिकाल,' 'गर्जा जयजयकार,' 'स्मृति' या अनुभूतीच्या दृष्टीने अगदी भिन्न अशा कविता घेतल्या तरी त्या सर्वांवर एक निराळेच तेज चढलेले आढळते.

या भव्य कल्पकतेला तेवढ्याच नाजूक संवेदनशीलतेची जोड मिळाली आहे. मात्र हा भावनाविलास हळवा नाही. स्वतःच्या क्षुद्र सुखदुःखांचे कोडकौतुक करून पावलोपावली त्यांचे काव्य बनविण्याची त्याला हौस नाही. मात्र आकाशवाणीवरून ध्वनिक्षेपित होणाऱ्या मधुर स्वरलहरींनी मोहून जाण्याइतके हे कविमन नाजूक आहे. गोदाकाठावर संध्याकाळच्या सावल्या दाटू लागल्या. आभाळ निळेकाळे झाले म्हणजे या कातर वेळी कविमन गुणगुणते—

'वाडा पडका नदीतटावर
भग्न आपुल्या प्रतिबिंबावर
गंगेमधल्या, खिन्नपणाने लावितसे दृष्टि
देउळ ते अन् भग्न हटाने
ध्येयनिष्ठ जणु जनाप्रमाणे
पडले तरिहि जपुनि ठेवि हृदयातील मूर्ती.'

कुसुमाग्रजांच्या या सर्व काव्यगुणांना चिंतनशीलतेचीही जोड मिळाली आहे. त्यांच्या चार काव्यसंग्रहांतून प्रगट झालेला कविमनातला आस्तिक आणि नास्तिक यांचा संघर्ष किंवा अर्थशून्य वाटणाऱ्या जीवनाचा अन्वयार्थ लावण्याची त्यांची धडपड, याचा आलेख एखाद्या रसिक अभ्यासकाने काढला तर भौतिकाकडे मोहरा वळविलेल्या आपल्या समाजाच्या मनातली कितीतरी अंतर्द्वंद्वे त्यात प्रतिबिंबित झालेली दिसतील.

'समिधा' सारख्या रूपककथा व गद्यकाव्ये यांचा संग्रह असो; 'दुसरा पेशवा' व 'कौंतेय' ही नाटके असोत किंवा जान्हवी कादंबरी असो, या सर्वांत जे सौंदर्यदर्शन होते त्याच्या मुळाशी कुसुमाग्रजांमधला भव्यतेचा, रम्यतेचा आणि मानवतेचा उपासक असलेला कवीच आहे असे आढळून येईल. हा कवी काही वेळा शाहीर होतो, क्वचित कारागीर बनतो; पण त्याच्यातली शाहिरी व कारागिरी जातिवंत कवीवर कधीच मात करू शकत नाही. मग ती निर्मिती 'हिमालयाच्या शुभ्र शिरावर रक्त आईचे ओघळले' अशी तात्कालिकातून प्रेरणा घेऊन किंवा कर्ण-कुंतीच्या संघर्षासारखी चिरंतनातून आपली स्फूर्ती शोधो.

साहित्यात सौंदर्य, सामर्थ्य आणि साधुत्व यांची पूजा एकाच वेळी करणे प्रतिभावंतांनासुद्धा जमतेच असे नाही. या तिन्ही घटकांचे योग्य प्रमाणात मिश्रण होऊन त्यातून नवे सुंदर रसायन निर्माण होणे ही एक किमया आहे. ती करू म्हटल्याने करता येत नाही. प्रकृती, प्रवृत्ती आणि प्रतिभा यांच्या अनुरोधानेच प्रत्येक कलावंताचा आविष्कार होत असतो. कुसुमाग्रजांना या तिन्ही तुल्यबळ महत्त्वाच्या घटकांची जाणीव आहे. त्यामुळे त्यांच्या साहित्यात — विशेषतः कवितेत—सर्व स्तरातल्या वाचकांना आकर्षून घेण्याइतके सामर्थ्य निर्माण झाले आहे. मात्र ज्यांचा सामाजिक अनुभूतीशी कोणताही संबंध नाही अशा अनेक सुरेख कविता कुसुमाग्रजांनी लिहिल्या असल्या, तरी लेखनाच्या प्रारंभकाळापासून त्यांच्या कविहृदयाची जी एक जखम सतत वाहात राहिली आहे तिचा इथे उल्लेख करणे आवश्यक आहे. ही जखम केली आहे जीवनातल्या जीव घेणाऱ्या विषमतेने! माणसाच्या स्वार्थी, लोभी, हिंस्र स्वभावाने! जगात चाललेल्या संहारक शक्तीच्या आंधळ्या तांडवाने! प्रेताच्या टाळूवरले लोणी खावे त्याप्रमाणे! कोट्यवधी भुकेल्या दीनदलितांनी भरलेल्या समाजातल्या मूठभर माणसांनी त्यांच्या श्रमावर

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मिळविलेल्या पैशांनी चालविलेल्या अर्थशून्य, नागड्या विलासांनी देव, धर्म, नीती, सत्ता, समाज, माणूस या सर्वांना कवि-हृदयाची ही जखम एकच प्रश्न विचारीत आहे, 'माणसांचे हे अमानुष बलिदान कधी थांबणार? नीरोच्या निर्दयतेला लाजविणाऱ्या या सामाजिक निर्घृणतेचे निर्मूलन कधी होणार?' म्हणूनच 'स्वगत' या अगदी अलीकडल्या काव्यसंग्रहाच्या प्रारंभीच ते म्हणतात—

'माझ्या गीताचे ध्रुवपद एकच आहे'
माणसाच्या माथ्यावर दारिद्र्यासारखा शाप नाही
पृथ्वीच्या पाठीवर!

इतके अमंगल, इतके दुःखदायक, इतके भेसूर दुसरे पाप नाही!

जोपर्यंत माझ्याजवळ गीतासाठी शब्द आहेत तोपर्यंत याच ध्रुवपदाचा, याच ध्रुवपदाचा
'माझ्या गीताला ध्यास आहे.'

या ध्यासाची क्षितिजे विशाल होवोत आणि कुसुमाग्रजांच्या प्रौढ प्रतिभेतून त्या क्षितिजावरले भास साकार होवोत एवढीच त्यांच्या सर्व चाहत्यांची इच्छा आहे.

* * *

श्री. के. क्षी.

# विंटर्स् टेल्

## अर्थात
## भारतीय अभिरुचीला जुळणारे शेक्सपियरचे एक नाटक

भारतीय वाचकांना शेक्सपियर प्रिय झाला आहे काय? अर्थात भारतातील ग्रंथालये पाहिली तर तो प्रिय झाला आहे असे म्हणावे लागेल. पण ही ग्रंथालये बहुधा परीक्षेकरिता इंग्रजी हा विषय शिकणाऱ्या, आणि परीक्षेकरिताच तो शिकविणाऱ्या गुरुशिष्यांच्या उपयोगाकरिताच सजविलेली असतात! अशा ग्रंथालयात साठविलेले शेक्सपियरविषयक ग्रंथ भारतीयांच्या शेक्सपियर-प्रेमापेक्षा त्यांचे परीक्षाप्रेमच दर्शवितात, असे मी म्हणेन. हे विद्यालयीन विद्वान आणि विद्यार्थी, शेक्सपियरच्या ग्रंथांपेक्षा त्याच्या टीकाकारांचे ग्रंथच अधिक वाचतात, आणि शेक्सपियरच्या ज्या ग्रंथांवर या टीकाकारांना खूप 'मल्लीनाथी' करण्याला अवसर असतो, तेच ग्रंथ परीक्षेला नेमणे या 'मल्लीं'च्या दृष्टीने योग्य ठरते! याचा परिणाम असा झाला की, विद्वान टीकाकारांनी शेक्सपियरच्या ज्या चार शोकनाट्यांवर आपली 'तालीम' जास्तीत जास्त खर्ची घातली, तीच नाटके आपली आवडती होऊन बसणे-निदान महाराष्ट्रात तरी-अपरिहार्य होऊन बसले. वास्तविक विद्वानांना आवडणाऱ्या आणि भारून टाकणाऱ्या हॅम्लेट, मॅक्बेथ, लियर इ० शोकनाट्यांखेरीज इतर नाटकेच सामान्य भारतीयांना अधिक आवडण्यासारखी आहेत. एका सामान्य वाचकाला—अर्थात शेक्सपियरच्या चतुर्थ शताब्दीनिमित्त हा छोटा लेख लिहिणाऱ्या या लेखकाला—आवडणारे असेच एक नाटक म्हणजे 'विंटर्स् टेल्' – अथवा 'शिशिरकथा' हे होय.

या नाटकाच्या मराठी भाषान्तराचे परीक्षण विद्यार्थिदशेत वाचल्यापासून माझ्या मनावर या नाटकाने खोल, पण नाजूक ठसा उमटविला आहे. सिसिली देशाची (त्रेटाची) राणी हर्मिऑनी इन्या एकनिष्ठेसंबंधी, राजा लिऑंटिझ याच्या मनात चमत्कारिकपणे संशय उत्पन्न होऊन त्याने त्या निष्पाप राणीचा जो छळ केला, त्याची या नाटकात कथा आहे. एकीकडे अकारण संशय, तर दुसरीकडे असहाय एकनिष्ठा, अशा दोन टोकांना या नाटकात वाचकाचे हृदय ताणले जाऊन विदीर्ण होते. हॅम्लेट, ऑथेल्लो या नाटकांप्रमाणे हे नाटक शोकपर्यवसायी आणि भीषण नाही, तथापि त्यात करुणरसाचेच राज्य आहे; आणि मुख्य म्हणजे भारतीयांना रुचणाऱ्या अनेक कोमल भावना व अनेक करुणवत्सल प्रसंग या नाटकात गोवलेले आहेत. यात वाचकांची गाठ केवळ निष्ठुर नियती आणि निर्धारी वीर पुरुष यांच्याशी नाही. निष्पाप आणि एकनिष्ठ अशी राजपत्नी, असहाय वत्सल अर्भके, शान्त, समयज्ञ आणि इमानी सेवक यांच्या परिसरात या 'शिशिरकथे'तील करुण प्रसंगही रमणीय झाले आहेत.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

दक्षिण अमेरिकेतील इक्वॅडॉर या चिमुकल्या देशातील एक बडा अधिकारी भारताचा दौरा करीत असता, माझी व त्याची मुलाखत होण्याचा योग आला. तो मला म्हणाला, " या अमेरिकन लोकांपेक्षा ( युनायटेड् स्टेट्स्-मधील लोकांपेक्षा ) तुम्हा भारतीयांत आणि आम्हांत अधिक साम्य आहे. "

" ते कोणत्या बाबतीत ? " मी त्याला विचारले. तो म्हणाला, " नाटके, चित्रपट इ० करमणुकीवरूनच पाहा. आमच्या दक्षिण अमेरिकेतील चित्रपटांत बायकामुलांचे कौटुंबिक वातावरण आढळेल. नुसत्या सामाजिक स्पर्धेची, क्रौर्याची, व्यभिचारी प्रेमाची आणि सूडाची चित्रे आढळणार नाहीत. "

एखादा अपवादात्मक पुरुष वा स्त्री घेऊन तिचे निर्दय विश्लेषण करण्यात फार तर लेखकाची जिद्द आणि कर्तबगारी दिसून येईल. पण सामान्य वाचकाला व प्रेक्षकाला आवडणारी प्रसन्नता आणि कोमलता त्यात आढळणार नाही. हॅम्लेट, मॅक्बेथ, ऑथेल्लो या नाटकांतले जग प्रारंभापासून नियतीने घेरलेल्यांचे जग आहे. भीषण नाट्यात अथवा 'ट्रॅजेडी'त मनुष्य करुणा आणि भीती या भावनांनी प्रथम क्षुब्ध आणि अखेर शुद्ध व शान्त होतो, असे ॲरिस्टॉटल् म्हणतो, हे खरे; पण प्रत्येक नाटकाने हा वमन-विरेचनविधी हाती घेतलाच पाहिजे असे ॲरिस्टॉटल्-देखील म्हणत नाही.

ॲरिस्टॉटल्चे काव्यशास्त्र अपूर्ण आहे; त्यातील आनंदप्रधान नाट्याचे विवेचन नष्ट तरी झाले आहे, नाहीतर लिहायचे तरी राहून गेले आहे. ग्रीक वाङ्मयात हास्यप्रधान, विडंबनप्रधान नाटकेही होती. ॲरिस्टॉफेनीसच्या नाटकांत भरपूर चेष्टा आणि विडंबन आहे. पण विडंबनात्मक नाटके आणि प्रसन्न कोमल नाटके एक नव्हत. ग्रीक लोकांना भीषणगंभीर नाटके आणि विडंबनात्मक नाटके या दोहोंच्यामधला पर्याय माहीत नव्हता. शेक्सपियरच्या रोमँटिक अथवा कल्पनारम्य नाट्यसंप्रदायात करुणरम्य पण आनंदपर्यवसायी नाटकांची ' Tragi-comedies ' ची जी प्रथा वाढीला लागली, ती ग्रीकांच्या गंभीर नाट्यपरंपरेत वाढीला लागलेली नव्हती.

भावनांचे खेळ दाखविण्यापेक्षा भवितव्यतेशी लढा दाखविण्यात ग्रीक नाटककारांना अधिक पुरुषार्थ वाटे. भारतीय नाटककार नायकनायिकांच्या मानसिक अवस्थांची चित्रे दाखवीत, कृतींचे चित्र दाखवीत नसत, अशी टीका कीथ याने संस्कृत नाटयाच्या विवेचनात केली आहे. नायकाला कर्माकर्मासंबंधी धर्मसंकट पडलेले दाखवून अखेर त्याच्या मर्यादित विवेकबुद्धीमुळे तो भीषण पर्यवसान पत्करतो, असे दाखविणे, भारतीय नाट्यशास्त्राला मान्य नव्हते. अर्थात " ग्रीक लोक शूर असल्यामुळे त्यांच्या संस्कृतीत भीषण अशा शोकनाट्याचा उदय झाला " ही उपपत्ती म्हणजे मात्र पाश्चात्त्यांच्या अनेक स्वयंमन्य उपपत्त्यांपैकीच आहे. भारतीय लोक भीषण भवितव्यचित्रणाला भीत असत असे नव्हे, रंगभूमीवरील दृश्यकाव्यात काय दाखवायचे, आणि केवळ शब्दांच्या श्राव्यकाव्यात काय दाखवायचे, याचा सूक्ष्म आणि उचित विवेक भारतीयांनी केलेला होता. महाभारतासारख्या राष्ट्रीय महाकाव्यात जीविताची जेवढी भीषणता भारतीय कवीने दाखविली आहे, त्याहून अधिक भीषण आणि अधिक वास्तव भवितव्यचित्र ग्रीक नाट्यातही नाही. पण रंगभूमीवरील प्रत्यक्ष दृश्यात असह्य यातना आणि अनिर्वचनीय भवितव्य ( नकळत प्रत्यक्ष मातेशी विवाह इ० ) दाखविण्यात ग्रीक कवींनी कलेचा उत्कर्ष साधला की काय, हा एक प्रश्न आहे. भारतीयांच्या काव्यकल्पनेप्रमाणे दुःखद घटनांतच समाप्त होणाऱ्या भीषण नाट्यापेक्षा, आपल्या विशाल उदरात अनेक सुखदुःख प्रसंग सामावून घेणारे महाकाव्यच जीवितदर्शनाला अधिक योग्य होय. भारतीय महाकवी भीषण वास्तवता चितारण्याला भितात असे नव्हे; ती दृश्यकाव्यात चितारणे ते रानटीपणाचे समजतात, एवढेच काय ते, असे मी म्हणेन.

भारतीयांची ही उच्च अभिरुची लक्षात घेता, हॅम्लेट व ऑथेल्लो ही नाटके महाराष्ट्रात लोकप्रिय झाली, हा केवळ शेक्सपियरच्या नाट्यकलेच्या व गणपतराव जोश्यांसारख्या नटांच्या अलौकिक अभिनयनैपुण्याचा विजय होय. पण महाराष्ट्रीय रंगभूमीवर शेक्सपियरचा प्रवेश झाला, तोच मुळी इंग्रजीच्या प्रोफेसरांचा हस्तावलंब करून ! अण्णासाहेब किर्लोस्कर, गोविंदराव देवल, गणपतराव बोडस, गोविंदराव टेंबे यांच्यासारख्या रसिकवर्यांच्या पुढे शेक्सपियरच्या सर्व प्रमुख नाटकांची सारखीच सुंदर रुपान्तरे उपलब्ध असती, ती आणि त्यांनी सारख्याच परिश्रमाने आणि तन्मयतेने सादर केली असती, तर ऑथेल्लोसारख्या क्रूर ट्रॅजेडीपेक्षा मर्चंट ऑफ व्हेनिस्, विंटर्स् टेल, सिंबेलाइन्, ॲज यू लाइक् इट् यांसारखी शृंगारकरुणप्रधान पण आनंदपर्यवसायी नाटके महाराष्ट्रांत अधिक प्रिय झाली असती; इतकेच नव्हे, तर महाराष्ट्राच्या अन्तर्जीवनात ती भारतीय लोककथां-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

इतकी बेमालूम एकरूप होऊन गेली असती. पण कल्पनारम्य काव्यमय नाटकांपेक्षा भवितव्यसूचक भीषण नाटके श्रेष्ठ मानण्याची पाश्चात्त्य परंपरा आमच्या इंग्रजीच्या प्रोफेसरांनी पाश्चात्त्य पंडितांच्या टीकावाङ्मयातून स्वीकारली; आणि भारताच्या परंपरेला अधिक जुळणारी शेक्सपियरची आल्हाद-दायक नाटके बाजूला टाकून, भीषण घटना आणि गंभीर चिन्तन यांबद्दल प्रसिद्ध अशी दुःखपर्यवसायी नाटके साध्याभोळ्या मराठी प्रेक्षकांच्या माथी मारली.

'विंटर्स् टेल्' अथवा 'शिशिरकथा' या नाटकाचे कथानक, पतिपरायण स्त्रीची असहाय एकनिष्ठा, सत्ताधारी पुरुषाचा हेकट संशयीपणा, आणि अखेर कालरूप धन्वन्त-ऱ्याच्या मात्रेच्या वळशाने अशा पुरुषाच्या जीवनात उदय पावलेला अनुताप या तीन अवस्थांच्या चित्रणाला वाहिलेले आहे. अशा काव्यमय नाटकातही शेक्सपियरच्या रोमरोमात भिनलेले सूक्ष्म मनोविज्ञान वाचकांना दर्शन दिल्याशिवाय रहात नाही. पतिपत्नीच्या शय्यागृहातच गुप्तपणे वावरणारा सर्वपरिचित 'संशय' हा मनोविकारच उदाहरणादाखल घ्या. 'विंटर्स् टेल्' या नाटकात याच संशयरूप गुप्त सर्पाचे चित्रण शेक्सपियरने ज्या अनुपम कौशल्याने केले आहे ते पाहण्यासारखे आहे. 'ऑथेल्लो' ही एक संशयपिशाच्चाने घडवून आणलेलीच शोकान्तिका आहे, असे पुष्कळदा म्हटले जाते. परन्तु ऑथेल्लो नाटकातील 'कर्ताकरविता' मनोविकार संशय हा नाही. ऑथेल्लोचा नाश संशयीपणाने झालेला नसून भोळसर विश्वासूपणाने झालेला आहे. त्याने निष्पाप डेस्डिमोनाविषयी **'संशय घेतला'** यापेक्षा नीच आयागोविषयी संशय **'घेतला नाही'**, हा ऑथेल्लोचा अधिक मोठा अपराध होय.

सिसिलीचा राजा लेऑंटिझ् याने आपला बालमित्र बोहेमियाचा राजा पॉलिग्झेनिस् याला फारा दिवसांनी मुद्दाम भेटण्याकरता बोलावले होते. बरेच दिवस या दोघा मित्रांनी आनंदोत्सवात काढल्यानंतर, बोहेमियाचा राजा स्वदेशी जाण्याकरता निघाला. सिसिलीच्या राजाने—लेऑंटिझ् याने—त्याला आणखी काही दिवस राहण्याचा परोपरीने आग्रह केला. परंतु राज्यकारभाराची कामे सोडून राहणे पॉलिग्झेनीस्ला शक्य नव्हते. 'आता तू तरी माझ्या बालमित्राला काही सांग' असे पतीने सुचविल्यामुळेच राणी हर्मिऑनी हने पॉलिग्झेनीस्ला आग्रह केला. मित्रपत्नीचा शब्द,—सुंदर, प्रेमळ, आणि शालीन अशा एका महाराणीचा शब्द—कसा मोडावा? या विचाराने पॉलिग्झेनीस् आपला बेत बदलतो!

किती स्वाभाविक घटना!—किती विशुद्ध असे हे वर्तन! पण संशयाला क्षयरोगाचे बीज मानले आहे ते यामुळेच. स्वतःच्या इच्छेवरूनच ज्या आपल्या एकनिष्ठ पत्नीने आपल्या मित्राला आग्रह केला, तिच्याच एक-निष्ठेबद्दल राजाच्या मनात किंतू उत्पन्न झाला; आणि प्रसन्न, सर्वसुखनिर्भर असे त्या राजदम्पतीचे वैवाहिक जीवन गढूळ झाले. वाऱ्याच्या प्रत्येक झुळकेबरोबर आग भडकतच जावी, तसा राजाचा संशय प्रत्येक घटनेबरोबर भडकतच गेला!

पण या आगीच्या उजेडातच शेक्सपियरने प्रेमाचे, निष्ठेचे, वात्सल्याचे आणि सौजन्याचे अनेक झुळझुळते निर्झर दाखविले आहेत; कारुण्याचे पाझर फोडले आहेत. आपल्या 'संशयित' मित्राला विष घालून मारण्याची लेऑंटिझ्ची योजना फसली यामुळे अधिकच बेफाम होऊन तो राणीच्या महालात गेला, तेव्हा त्या उभयतांचा लहानगा मुलगा आपल्या आईला गोष्ट सांगण्यात दंग होता, असे शेक्स-पियरने दाखविले आहे! आपल्या आईला आपल्यापासून तोडून कैदेत ठेवण्यात आले, हे त्या वत्सल अर्भकाला कळल्याबरोबर त्याने अन्नपाणी सोडले.

कैदेत असताच राणी प्रसूत होऊन तिला एक कन्या झाली. राणी हर्मिऑनीची ही कहाणी वाचताना सत्त्वशील सती सीतेच्या कथेचे स्मरण झाल्याशिवाय रहात नाही. सर्व जगताला आदर्श अशी स्त्री निर्माण करण्याचे वाल्मीकि मुनीचे ध्येय शेक्सपियरच्या डोळ्यांपुढे असण्याचे काहीच कारण नव्हते. आजचे बाजारी औद्योगिक जग निर्माण होण्यापूर्वी जगातील सर्व सुसंस्कृत समाजात ज्या प्रेमळ, निर्मळ आणि सोशिक स्त्रिया अनेकदा दिसून येत, तशीच एक निर्मळ स्त्री त्याने रंगविली आहे. पण ती रंगविताना तिला तोंडाळ प्रचारक न बनविता केवळ स्त्रीजन्मा-मुळेच तिचे जीवन परावलंबी आणि यातनामय झाल्याचे त्याने दाखविले आहे. भारतीय स्त्री म्हणजे सोशिक; आणि पाश्चात्त्य स्त्री म्हटली की बंडखोर; ही कित्येक भारतीयांची कल्पना बरोबर नाही. स्त्री म्हटली की, पृथ्वीच्या पाठीवर कुठेही असहाय आणि सोशीकच असणे तिच्या निसर्गातील स्थानामुळे अपरिहार्य होय. या असहायतेचा आणि कारुण्याचा फार मोठा वाटा निसर्गाने तिच्यावर सोपविलेल्या मातृत्वाकडे जातो, हे सर्व श्रेष्ठ कवींनी ओळखलेले आहे. तसेच जेव्हा जेव्हा यातनामय स्त्रीचरित्र रंगवायचे असेल, तेव्हा तेव्हा तिच्या गर्भावस्थेचा आणि

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रसूतीचा उपयोग व उल्लेख ते नेमक्या स्थळी करतात. सीतेचा त्याग, रामाने कोणत्याही उदात्त तत्त्वाकरता केलेला असो, परित्यक्त जानकीचे जीवन कमालीचे करुणास्पद होण्याचे कारण सीता त्या वेळी गरोदर होती, हेच होय. शेक्सपियरच्या 'शिशिरकथे' ची नायिकाही आपल्या स्वामीच्या अवकृपेला पात्र झाली, तेव्हा गरोदरच होती. तिला कारागृहातच कन्यारत्न झाले. पण या अत्यंत करुण आणि हताश स्थितीतच राणीच्या मुक्ततेची आणि संशयमुक्ततेची बीजे लपलेली असल्याचे शेक्सपियरने मोठ्या कौशल्याने दाखविले आहे!

राजाच्या अघोरी संशयाने त्याचे दरबारी सल्लागार अगदीच दबकून गेले होते. पण राणीला कारागृहात एक कन्या झाली, ही वार्ता कळताच, एका धीट आणि सज्जन स्त्रीच्या हृदयातील कारुण्यानेच धाडशी रूप घेतले. राजा लेऑंटिस् याच्या दरबारचा एक मानकरी ॲंटिगॉनस् याची पत्नी पॉलिना हिने कारागृहात जाऊन नूतन प्रसूत राणीची भेट घेण्याचे साहस केले. कारागृहात जन्मलेली ती कोवळी कलिका घेऊन, संशयपिशाच्चाने झपाटलेल्या संतप्त राजाकडे स्वतः जावयाचे तिने ठरविले. तिचा पती पंचहत्यारी सरदार ॲंटिगॉनस् हादेखील आपल्या पत्नीचा हा विचार ऐकून चळचळा कापू लागला. पण शूर पॉलिनाने त्याची पर्वा केली नाही. त्या नूतनजात राजकन्येला घेऊन पॉलिना राजापुढे गेली. इतकेच नव्हे तर तिने निर्भयपणे त्या परित्यक्त राणीची बाजू मांडली, आणि निर्दयपणाबद्दल आणि संशयीपणाबद्दल राजाची त्याच्या तोंडावर निर्भर्त्सना केली.

शेक्सपियर सनातनी होता, की पुरोगामी होता, हे जन्मभर शेक्सपियर-चर्वणामध्ये गढून गेलेले पंडितही सांगू शकणार नाहीत. तरी एक गोष्ट मात्र खास! डेस्डिमोना, आणि हर्मिऑनी यांच्यासारख्या भाबड्या, असहाय्य आणि सर्वस्वी सिंधूसदृश स्त्रिया रंगविणारा शेक्सपियर, धाडसी आणि कर्तबगार स्त्रियांचाही तितकाच चाहता होता. पोर्शिया, एमिलिया, पॉलिना यांच्यासारख्या 'मॉडर्न' स्त्रियाही शेक्सपियरने रंगविल्या आहेत; लेडी मॅक्बेथसारखी निर्घृण स्त्रीही त्याने रंगविली आहे; हॅम्लेटच्या आईसारखी विकारग्रस्त पुरंध्रीही त्याने रंगविली आहे; बुद्धिमान पुरुषावर प्रेम करण्याची लायकी नसलेली लिबलिबीत बाहुली ऑफीलियाही त्यानेच रंगविली आहे! पण त्याच्या प्रमुख नायिका या प्रायः 'हिंदू' आहेत. नव्हे 'सिंधू' आहेत,—हे विसरता येत नाही!

'विंटर्स् टेल्' या नाटकाच्या घटना, नायक लिऑंटिस् याच्या संशयाच्या उधाणाबरोबर चढत जाणाऱ्या दाखविलेल्या आहेत. ज्यांचे डोके पत्नीच्या वर्तनाबद्दलच्या संशयाने भणाणलेले आहे, असे लोक स्वतःच्या अर्भकाच्या दर्शनाने शुद्धीवर येत नसतात; क्वचित त्या अर्भकाबद्दलही त्यांना शंका येतात! लिऑंटिस् राजाने त्या नूतनजात कन्येला दूरदेशी निर्जन वनांत टाकून देण्याचा हुकूम सोडला. पॉलिनाचे धाडशी चाळे आणि साहसी उपदेश बंद व्हावे, म्हणून त्याने तिच्या नवऱ्यावर हुकूम बजावला व तिला दरबारातून बाजूला नेण्यास सांगितले!

एखाद्या महासागरावरील तुफानाप्रमाणे चढत जाणारे या नाटकाचे संविधानक यानंतर दुसऱ्याच बाजूला वळते. कुठल्या तरी निर्जन बेटाच्या किनाऱ्यावर ज्या छोट्या बालिकेला सोडून दिलेले असते, ती नेमकी बोहेमियाच्या किनाऱ्याला, म्हणजे ज्या मित्राचा आपल्या राणीशी वाईट संबंध असावा, असा लिऑंटिस्चा वहीम होता, त्याच्याच राज्याच्या किनाऱ्याला* येऊन पोचते! यातना आणि कुशंका यांच्या राज्यातून विंटर्स् टेल्चे कथानक जणू एका शांत, रम्य नंदनवनात येऊन ठेपते. या रम्य जगात अज्ञात व निर्धन आईबापांच्या झोपडीत लहानाची मोठी होऊन ही परित्यक्त राजकन्या–'पर्डिटा'–अखेर एका राजसेवकाच्या प्रयत्नांनी आपल्या पित्याच्या राजधानीत येऊन पोचते.

ॲरिस्टॉटल्ने आपल्या नाट्यशास्त्रात 'अभिज्ञान' (ओळख पटणे) अथवा 'Anagnorisis' या घटनेला संविधानकात फार महत्त्वाचे स्थान दिले आहे. कालिदासाच्या प्रख्यात नाटकाचा उल्लेख पाश्चात्त्य लोक नुसत्या 'शकुन्तला' या नावाने करीत असले, तरी त्या नाटकाचे खरे नाव 'अभिज्ञान-शाकुन्तलम्' असे आहे, ही गोष्ट ॲरिस्टॉटल्ला तरी उपेक्षणीय खास वाटली नसती. दुष्यन्ताला शकुन्तलेची 'ओळख पटणे' या घटनेला संविधानकात त्याचे शकुन्तलेवर प्रेम बसण्याहूनही अधिक महत्त्व आहे.

---

* वास्तविक बोहेमिया हा झेकोस्लोव्हाकियाचा एक प्रांत असून त्याला किनारा नाही. शेक्सपियरच्या भूगोलज्ञानाचे एक उदाहरण म्हणून हे दाखविण्यात येते. रॉबर्ट ग्रीनच्या ज्या नवलकथेवरून (पॅंडोस्टोवरून) शेक्सपियरने हे नाटक लिहिले त्या मूळ कथेतच हा चुकीचा भौगोलिक उल्लेख होता! —ले०



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'शिशिर कथा' अथवा Winter's tale या नाटकातही परित्यक्त 'पर्डिटा'ची तिच्या पश्चात्तप्त पित्याला ओळख पटण्याला नाट्यात्मक महत्त्व पराकाष्ठेचे आहे.

पण या करुणरम्य नाटकातील सर्वांत करुण आणि सर्वांत 'भारतीय' असा प्रसंग यापुढेच आहे. नाटकाच्या शेवटच्या अंकाच्या शेवटच्या प्रवेशात पश्चात्तप्त राजाचे आणि राणी हर्मिऑनीचे पुनर्मीलन होते. वास्तविक हर्मिऑनी ही पुत्रशोकाने निधन पावली, असा पुकारा तिची धीट आणि कर्तृत्ववान मैत्रीण पॉलिना हिने अनेक वर्षांपूर्वीच केलेला होता. परंतु परित्यक्त राजकन्या पर्डिटा ही मोठी होऊन अचानकपणे राजधानीत आल्यावर व राजाला तिची ओळख पटल्यावर राजाचे मन दुःखाने आणि अनुतापाने भरून जाते. या पुनर्मीलनाचे वेळी पर्डिटाची माता हयात नाही,— व तिच्या निधनाला आपणच कारणीभूत आहोत या जाणिवेने, राजा लिऑंटिझ् शोक आणि अनुताप यांनी व्याकुळ होतो.

अनुतापाने विरहदुःख अधिक तीव्र करणे आणि त्या दोहोंच्याही अग्नीत पोळवून नायकाचे चित्त शुद्ध करणे हा प्रकार शाकुन्तल नाटकातही आहे आणि उत्तरराम-चरितातही आहे. ॲरिस्टॉटल् याने ज्या 'अभिज्ञान–प्रसंगाला' परमावधीचे नाट्यात्मक महत्त्व दिले आहे, तो प्रसंग म्हणजे शाकुन्तलाच्या शिल्पाचा आधारस्तम्भच होय. 'विंटर्स् टेल्' मधील अभिज्ञानप्रसंगानेही नायकाचे अनुतापयुक्त दुःख अधिकच वाढले आहे व त्याची चित्त-शुद्धीही झाली आहे. पण 'विंटर्स् टेल्'च्या शेवटच्या अंकातील नायकनायिकांचा पुनर्मीलनाचा प्रसंग हा कारुण्य, आणि नाट्यात्मकता या दोन्हीही दृष्टींनी त्या नाटकाचा उत्कर्षबिंदू साधणारा आहे. या प्रसंगाचे सादृश्य काही बाबतीत उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अंकाशी आहे. पॉलिना हिने 'विंटर्स् टेल्'च्या संपूर्ण संविधानकात जे धैर्य आणि कर्तृत्व दाखविलेले आहे, त्याची सार्थकता या प्रवेशात आहे. पॉलिनाच्या कर्तबगारीचाही येथे परमोत्कर्ष आहे. ती केवळ धीट आणि सहृदयच होती, असे नव्हे, तर परमा-वधीची चतुर आणि समयज्ञही होती. उत्तररामचरितात दैवी शक्ती असलेल्या वनदेवतांनी सीतेला अदृश्यरूपात रामाला भेटवून जे कार्य केले, त्यासारखेच 'विंटर्स् टेल्'च्या अखेरच्या प्रवेशातील पॉलिनाचे कार्य आहे. संविधानकाच्या आरंभी नायकाने केलेल्या प्रमादांचे परिमार्जन व्हावे, एवढा तीव्र अनुताप तर नाटकाच्या या शेवटच्या भागात दाख-विलेला आहेच; पण नायकाचा तो अनुताप, आतापावेतो अकारण छळ आणि अपमान सोसणाऱ्या नायिकेला प्रत्यक्ष पाहावयाला मिळावा, अशीही योजना नाटकाच्या या भागात आहे. दिवंगत मानल्या गेलेल्या राणीची हुबेहूब तसबीर आपल्याकडे आहे असे तिची कैवारी मैत्रीण पॉलिना हिने, विरही आणि अनुतप्त अशा राजाला सांगितले. वस्तुतः या सुप्रसिद्ध चित्रदर्शन प्रसंगात चित्र-शिरीत पडद्याआड स्वतः राणीलाच उभे केलेले असल्याने अनेक वर्षांनी राजाला पाहणाऱ्या राणी हर्मिऑनीला राजाची अनुतापवेदना प्रत्यक्ष पाहायला सापडते. ज्या नाट्यतंत्राला पाश्चात्त्य नाट्यशास्त्रात Dramatic Irony हे नाव आहे, त्याचा उपयोग उत्तररामचरिताच्या सुप्रसिद्ध तिसऱ्या अंकातही आहे आणि 'विंटर्स् टेल्'च्या पाचव्या अंकाच्या शेवटीही आहे. या नाट्यतंत्राला आपल्या नाट्यशास्त्रात स्वतंत्र नाव नसले, तरी त्याची निपुणयोजना मात्र आपल्या अनेक प्राचीन नाटकांत आहे. नाट्यप्रसंगांत असा भाग योजावयाचा की, जो प्रेक्षकांना दिसत आहे, माहीत आहे, पण नाटकातील एका अगर अनेक पात्रांना मात्र माहीत नाही, या नाट्य-तंत्राला Dramatic Irony असे म्हणतात. उत्तररामचरित्र आणि 'विंटर्स टेल' या नाटकातील उपरिनिर्दिष्ट भागात केवळ या Irony चीच योजना आहे असे नव्हे. या Irony-च्या तंत्राने अनुतापमिश्रित करुणरसाचा परमोत्कर्ष या दोन्ही प्रसंगांत साधलेला आहे, हे सादृश्य विशेष लक्षणीय आहे.

प्राचीन संस्कृत नाटकांतील अभिज्ञानप्रसंग व अनुताप-चित्रण अधिक उदात्त, की 'विंटर्स् टेल्'मधील चित्रण अधिक उदात्त, या तुलनेत शिरणे या लेखाच्या मर्यादेत बसण्या-सारखे नाही. पण 'विंटर्स टेल'च्या या त्रुटित आलो-चनाच्या द्वारे मला काही विशिष्ट नाट्यतत्त्वांकडे लक्ष वेधायचे आहे.

नाटकात घटनांना अधिक महत्त्व की स्वभावपरिपोष व रसपरिपोष यांना अधिक महत्त्व, या प्रश्नाचे ॲरिस्टॉटल्ने जे उत्तर दिले आहे ते प्रसिद्धच आहे. तो घटनानिर्मिती अथवा 'संविधानक' सर्वांत महत्त्वाचे मानतो. ॲरिस्टॉटल्चे हे मत आजच्या वाङ्मयीन सुराशी विसंगत आहे हे माहीत असूनही, मी ॲरिस्टॉटल्चे मतच सर्वस्वी ग्राह्य मानतो. पण 'संविधानक' हा नाटकाचा प्राण मानणे, म्हणजे केवळ भीषणपर्यवसायी, प्रक्षोभकारी, तत्त्वविचारप्रवर्तक

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नाटकांनाच प्राधान्य देणे असे मात्र खास नव्हे. कोमलता, काव्यमयता, अद्भुतता यांनी भरलेल्या नाटकांनाही वाङ्मयात गंभीरप्रकृती 'ट्रॅजेडी' इतकेच महत्त्व आहे. किंबहुना आपल्या नाट्यशास्त्राचा आणि साहित्यशास्त्राचा तर 'फैसला' भीषणपर्यवसायी नाटकांच्या विरुद्ध आहे. केवळ पाश्चात्त्य नाट्याशी परिचय झाल्याने, आपली मूळ राष्ट्रीय प्रकृतीच बदलली असा अर्थ मुळीच नव्हे. कोमल काव्यमय नाटक हेच आपल्या राष्ट्रीय परंपरेला धरून आहे. काव्यमयता म्हणजे घटनाशून्यता नव्हे, हे मात्र फिरून येथे सांगितले पाहिजे. उत्तररामचरिताचा तिसरा अंक हे नाव्यात्मक रसपरिपोषाचे सर्वोत्कृष्ट उदाहरण होय. घटना, Dramatic Irony, स्वभावपरिपोष या सर्वांचा येथे इतका सुंदर मिलाफ आहे की, भारतीय नाट्याला, 'नाटकाच्या नांवाखाली लिहिलेली दीर्घ काव्ये' म्हणून नाक मुरडणारांना हा प्रवेश हे एक उत्तरच आहे. पण ही विचित्र टीका ॲरिस्टॉटल्च्या काव्यशास्त्रावर सर्वमान्य भाष्य लिहिणाऱ्या प्रो. एस्. एच्. बुचर यानेही केलेली आहे. समग्र भारतीय नाट्य–वाङ्मयाला नाट्यदृष्ट्या निकृष्ट ठरविताना तो म्हणतोः––

"India has produced vast poems which pass under the name of dramas, wanting however both the unity of action and the spiritual freedom which the drama proper implies."

बुचर याची ही टीका शेक्सपियर याच्या 'विंटर्स् टेल्'-सारख्या नाटकांनाही लागू पडते, असे मला वाटते. संस्कृतातील सर्व प्रसिद्ध नाटके आणि शेक्सपियरची कित्येक प्रसिद्ध नाटके ही दोन्ही ज्या वर्गात पडतात, त्या वर्गातील नाटके, ग्रीक ट्रॅजेडीच्या घट्ट साच्यात बसत नाहीत, एवढ्याकरिता "नाटकाच्या नावाखाली लिहिलेली दीर्घ काव्ये" म्हणून टाकाऊ ठरविणे योग्य होणार नाही. इतकेच नव्हे, तर भारतीय अभिरुचीच्या दृष्टीने ती कदाचित अधिक रमणीय व श्रेष्ठही ठरतील.

शेक्सपियरच्या चतुर्थ शतसांवत्सरिक उत्सवाच्या निमित्ताने, शेक्सपियर–नाट्यसंभारातील 'भारतप्रिय' भाग, पाश्चात्त्य पंडितांचे दडपण बाजूला सारून नव्याने निवडण्याची आवश्यकता आहे, असे मला वाटते.

* * *

प्रा. के. पं. मंगळवेढेकर

# मराठी नाटकांतील स्वगते–शेक्सपियरचा प्रभाव

मराठी रंगभूमीच्या प्रारंभीच्या कालात शेक्सपियरचा सर्वत्र पडलेला प्रभाव कोणाही नाट्याच्या अभ्यासकाला सहजपणे दिसून येईल. सुरुवातीच्या या कालात शेक्सपियरची कित्येक प्रसिद्ध व अप्रसिद्ध नाटके, शोकान्तिक आणि सुखान्तिक, आपले मूळचे रूप, रंग, वातावरण घेऊनच भाषांतराच्या स्वरूपात मराठी रंगभूमीवर आली. हॅम्लेट व विकारविलसित, झुंझारराव, मानाजीराव, कपिध्वज, त्राटिका ही निवडक नावेच शेक्सपियरच्या मराठी रंगभूमीवरील आक्रमणाची प्रभावी साक्ष देतील. त्यांतही गणपतराव जोशी व बाळाबुवा जोग यांसारखे मुरब्बी नट रंगभूमीवर असल्याने त्यांनी शेक्सपियरची पात्रे जिवंतपणे लोकांच्या पुढे उभी केली. एवढेच नव्हे तर त्यांचा अविस्मरणीय ठसा लोकांच्या मनावर उठवला. गणपतराव जोश्यांची आठवण ही जुन्या पिढीच्या नाट्यरसिकांना एक अमोल व सुखद ठेवा वाटतो.

भाषांतरासारख्या स्थूल माध्यमातून शेक्सपियर हा मराठी रंगभूमीवर आला. पण त्याने मराठी नाट्याच्या अंगप्रत्यंगावर आपली मुद्रा उठवली. नाट्यवस्तूची रचना, पात्रांच्या परिणामकारक परिपोषाचे तंत्र, अद्भुत व रमणीय वातावरण, खटकेबाज प्रसंग, दुःखाचा ताण कमी करणारा विनोद, मूळ कथानकाची उत्कंठा वाढवण्याकरता दुय्यम कथानकाची योजना व विशेष म्हणजे वैयक्तिक सुख-दुःखातून शाश्वत मूल्यांचा शोध ही शेक्सपियरची वैशिष्ट्ये मराठी नाटककारांनी आपापल्या मगदुराप्रमाणे उचलली व आपल्या अस्सल मराठी नाटकांतही ती अभिव्यक्त केली. किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी हे मराठी रंगभूमीच्या दौलतीचे मानकरी.

किर्लोस्कर (व देवलही) यांनी संस्कृत वाङ्मयातील व महाभारतातील नाट्यमय प्रसंग अस्सल मराठी वातावरणात लोकांपुढे आणले तर–देवल कोल्हटकर–गडकरी–खाडिलकर

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ह्यांचे मन शेक्सपियरच्या जादूने एवढे भारले होते की, कित्येक वेळा त्यांच्या नाट्यवस्तूंची स्फूर्तीही सरळसरळ शेक्सपियरच्या नाटकांतून त्यांनी घेतलेली दिसते. कोल्हट-करांचो कथानकातील गुंतागुंत, गडकऱ्यांचे उदात्त नायक व त्यातूनही उदात्त नायिका व त्यांचे गगनविहारी काव्य यांचे स्फूर्तिस्थान हेच होय. निर्भेळ मराठी थाटाचे नाटक लिहीत असताही नाटककार शेक्सपियरच्या तंत्राशी किती एकजीव झाले होते याची ही साक्ष आहे. खाडिलकरांच्या काही नाटकांत तर शेक्सपियरचीं काही पात्रे वेष व भाषा बदलून वावरताना दिसतात. हॅम्लेट व इयागो यांना 'सवाई माधवरावांचा मृत्यू' या नाटकात एकत्र आण-ण्याचे विलक्षण साहस खाडिलकरांनी यशस्वीपणे पार पाडले. केशवशास्त्री ही इयागोची मराठी प्रतिमा. आणि माधवराव,–त्याच्यात हॅम्लेट आणि ऑथेल्लो या दोघां-च्याही व्यक्तिमत्त्वाचे धागे बेमालूमपणे एकजीव झाले आहेत. माधवरावाचे आंतरिक द्वंद्व, केशवशास्त्र्याच्या कारस्थानाने संशयाच्या ठिणगीतून निघालेला विपण्णतेचा भडका, या विपण्णतेतून निर्माण झालेली विमनस्क भ्रांती व तिच्या अतिरेकाची आत्महत्येत परिणती या अत्यंत प्रभावशाली कथेचा ओघ नियतीच्या अनिरुद्ध गतीने विनाशाकडे झपाट्याने जातो. त्यांच्या 'भाऊबंदकी' या गाजलेल्या नाटकात मॅक्बेथ व ज्यूलियस सीझर यांचा स्पष्ट ठसा दिसतो. मृत सीझर जिवंत सीझरपेक्षा अधिक बलशाली ठरतो आणि ब्रूटसचे मनोरथ उद्ध्वस्त करतो. नारायण-रावाच्या वधाने आपली महत्त्वाकांक्षा पुरी झाल्याचा आनंदीबाईस क्षणिक आनंद होतो, पण खुनातून बारभाई निर्माण होते आणि तिचे मनोराज्य भग्न होते. आनंदीबाई ही लेडी मॅक्बेथ आहे तर राघोबा व मॅक्बेथ हे समान वाटतात. दोघेही आपली सदसद्विवेकबुद्धी मारू शकत नाहीत. तिची टोचणी त्यांना सतत व्यथित करते. आपल्या घरी पाहुणा म्हणून आलेल्या डंकनला मारण्याची कल्पना मॅक्बेथ प्रथम झिडकारतो. पेशवाई ही वडील घराण्यात असली पाहिजे व नारायणराव आपला शत्रू असला तरी पुतण्या आहे, त्याचा खून अमंगल आहे ही मॅक्बेथप्रमाणे राघोबाच्या मनाची धारणा. दोघेही शूर, उमदे. पण बायकोच्या बेबंद महत्त्वाकांक्षेचे असहाय बळी. धन्याच्या रक्ताने भिजलेली तलवार मॅक्बेथ हातात घेऊ शकत नाही. त्याच्या बायकोला मेलेल्या माणसात व झोपलेल्या माणसात फरक दिसत नाही. गारद्यांच्या तलवारी नारायणरावाच्या पोटात शिरल्यावर राघोबाला आपली निर्घृणता भयभीत करते. दार बंद केल्यावर दृष्टीआड सृष्टी होऊन तो समाधान मानतो. पण 'काका, काका' या आपल्या पुतण्याच्या आर्त किंकाळ्या वादळी समुद्राच्या लाटांप्रमाणे त्याच्या कानावर आदळतच राहतात. आयुष्या-च्या अखेरीस 'My life has fallen into the seer, the yellow leaf' ही जाणीव मॅक्बेथला होते. 'मला बरे म्हणणारा जगात कुणी उरला आहेसे मला वाटत नाही' हे निराश उद्गार राघोबाही काढतो.

नाट्यवस्तूच्या निवडीत, स्वभावपरिपोषाच्या पद्धतीत, रचनाकौशल्यात ज्याप्रमाणे शेक्सपियरच्या तंत्राचा परिणाम मराठी नाटकात दिसतो त्याप्रमाणे मराठी नाटकांत आलेल्या स्वगत भाषणांतही तो दिसतो. वास्तवतेची प्रतिज्ञा करणाऱ्या नवीन नाट्यतंत्राला 'स्वगत' हे मान्य होण्या-जोगे नाही. हॅम्लेट स्वतःच्या गूढगुंजनात जग विसरतो. इयागो आपल्या कारस्थानांच्या यशाचा आसुरी आनंद स्वतःशीच व्यक्त करतो. दारूच्या व्यसनामुळे आपण कसे कुचकामी झालो हे सुधाकर स्वतःलाच सांगतो व गोकुळ आपल्या विसरभोळेपणाचे अद्भुत पराक्रम रंगवून स्वतः-शीच कुशारकी मारतो व प्रेक्षकांची करमणूक करतो—हा प्रकार वास्तवतेला मंजूर नाही. तथापि स्वगत हे परंपरागत नाट्यतंत्रात इतके पक्के रुजले आहे की, आधुनिक नाट्यही त्याला पूर्णतया हद्दपार करू शकले नाही. शेक्सपियरने ज्या-प्रमाणे आपल्या नाटकात स्वगतांची कलात्मक पेरणी केली व त्यांतून उत्कट भावनेचे भरघोस पीकही काढले त्याच-प्रमाणे मराठी नाटकांतही स्वगतांचा यथायोग्य वापर व उपयोग नाटककारांनी केलेला दिसेल. शेक्सपियरमध्ये स्वगताचा उपयोग निरनिराळ्या तऱ्हेने केलेला आढळतो. स्थूल स्वरूपात व प्राथमिक अवस्थेत स्वगत हे मागील महत्त्वाच्या घटनांवर प्रकाश टाकील, त्यापैकी एखाद्या विशेष प्रसंगावर आपले लक्ष केंद्रित करील. क्वचित आगामी घटनांची चाहूलही देईल. इयागोच्या मनातील ऑथेल्लो-बद्दलचा आकस, त्याची सूडाची भावना व त्याच्या कारस्थानाची दिशा या गोष्टी त्याच्या स्वगतांतूनच आपणास दिसतात. 'सवाई माधवरावांचा मृत्यू' या खाडिलकरांच्या नाटकातील पहिल्याच प्रवेशातील केशव-शास्त्र्याचे पहिलेच स्वगत पहा :—

"राज्ये मंत्राने मिळतात. एक पाऊल अविचाराने टाकावे की सगळी इमारत ढासळली. बळवंतराव पटवर्धन व विष्णू नरहर यांच्या फितुरीच्या वेळेस आनंदवल्लीस आनंदीबाईने माझी सल्ला ऐकली असती—जाऊ द्या,—

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गतं न शोचयेत्—आजच्या दरबारात हत्तीच्या पायी तुडवून नागनाथाला ठार करण्याचा हुकूम होणार. या फितुरीतून आपण तर शिताफीने निसटलो! इतकेच नव्हे, तर काल नागनाथाला पकडले त्या वेळी, आज नागनाथाची चौकशी चालली असताना आणि उद्या नागनाथ हत्तीच्या पायी तुडविला जाईल तेव्हाही माझ्या फितुरीच्या मंत्राला केव्हाच खळ नाही. आनंदीबाईंचे हेतू अखेरीला तडीस जातील व पेशव्यांचे पद बाजीरावाला माझ्यामुळे मिळेल. माझ्या मंत्राचा पगडा या शनवारवाड्यावर बसू द्या, माणसांनी भरलेला हा वाडा पिशाच्चांनी गजबजल्यासारखा दिसेल.'

नाटकाच्या प्रारंभीचे हे स्वगत अनेकदृष्ट्या नाटकात महत्त्वाचे आहे. या शोकनाट्यातील घटनांचा कर्ताकरविता केशवशास्त्री याच्या स्वभावाचा अंकुर यात स्पष्ट दिसतो. या कुटिल कारस्थानाचा तो सूत्रधार आहे. फितुरीचा त्याचा पूर्वापार चालत आलेला उद्योग, फितुरीच्या शिक्षेतून स्वतःची कातडी बचावल्याचा स्वार्थी आनंद, नागनाथाच्या मृत्यूबद्दलची बेदरकार बेफिकिरी व शनवारवाड्याला पिशाचवसतीचे स्वरूप आणण्याची त्याची मनीषा — सर्व गोष्टी या स्वगतातून स्पष्ट होतात. हे स्वगत म्हणजे पुढे घडणाऱ्या शोकांतिकेचा सूचक इशाराच होय. या स्वगतात भूतकालातील केशवशास्त्र्याच्या उद्योगाचे अर्थपूर्ण दर्शन होते. वर्तमानकालातील नागनाथाच्या वादग्रस्त घटनेबद्दल माहिती होते आणि भीषण भविष्याची पुसट पाऊलवाटही दिसते. नाटकाच्या प्रारंभी येणारी स्वगते अशी स्पष्टीकरणात्मक असतात. 'पुण्यप्रभाव' मधील ईश्वराचे पहिले स्वगतही याच स्वरूपाचे आहे.

आगामी ऐश्वर्याची चाहूल लागताच लेडी मॅक्बेथ पुढच्या कटाचे मनसुबे मोठ्या कौशल्याने बांधते. नवऱ्याची पावित्र्यावरची श्रद्धा त्याच्या पापशंकी मनाची ऋजुता यांना मुरड घालून सामोरे येणारे राज्यपद झटकन कसे एका छोट्या आडमार्गाने पटकवता येईल ते पटवते. राघोबालाही पेशवाई मिळवून देण्याचा साधा सोपा मार्ग आनंदीबाईंच्या मनात कसा घोळत आहे पाहा:—

"आम्ही जसा हुकूम करू तसं वागायला जर गारदी तयार आहेत आणि आणाशपथा म्हणून जर त्यांनी हा बेलभंडारा उचलून दिला आहे, तर नारायणाला धरावे असला मिळमिळीत हुकूम कशाला केलात? पराक्रम करून धनदौलत कमवायची कशी हे पुरुषांना समजते, पण घरात चालून आलेली लक्ष्मी घरातच कशी कोंडून ठेवायची, ही अक्कल पुरुषांनी बायकांपासूनच घेतली पाहिजे. पुरुषांचा पुरुषार्थ बायकांमुळे पिढ्यानपिढ्या कायमचा टिकतो. पुरुष चंचल वृत्तीचे व प्रसंगापुरता विलक्षण पराक्रम करून दाखविणारे. बायका स्थिर व गंभीर असून पुरुषाच्या कामाला टिकाऊ स्वरूप देतात. 'नारायणाला धरावे' धरावे काय म्हणून? मारावे असे पाहिजे. एकदा आपल्या अंगावर पेशवाईची वस्त्रे पडली म्हणजे गंगेला घोडे न्हाइले असे तिकडे वाटते; पण तिकडच्या अंगावरची ती अधिकाराची वस्त्रे माझ्या पोटी जन्मलेल्या पेशव्याच्या अंगावर झळकलेली पाहिल्याशिवाय मला कसे समाधान वाटेल? नारायणाला जिवंत ठेवला–आणि बाईंनी पुन्हा कारस्थान केले आणि साठ्यांची ती पोर—कालची ती गंगटी—अधिकाऱ्याच्या तोऱ्याने पुन्हा सामू होऊन बसली तर मला नाही ग बाई सहन व्हायचे. मी 'ध' चा 'मा' करणार!"

लेडी मॅक्बेथचे पोलादी मनसुद्धा शेवटची ताण असह्य होऊन भंगून जाते.. पण सूडाचा आनंदीबाईंचा निश्चय तिचे सर्व मनोराज्य धुळीस मिळाल्यावरही रतीभरही ढळत नाही. आपल्या व आपल्या मुलाच्या ऐश्वर्याखातर राष्ट्राची होळी करण्यासमुद्धा ती तयार होते. तिचे शेवटचे स्वगत पाहा; सर्वस्व नष्ट झाल्यावर विनाशातून नवी उभारी धरण्याची तिची जिद्द, तिचा चिवटपणा, स्वार्थाकरता देशाची आहुती देण्याची तिची बेलगाम आकांक्षा पुरुषातल्या पुरुषालाही लाजवील. स्त्रीसुलभ शालीन गुणांना यत्किंचितही अवसर न देणाऱ्या या स्त्रीचे भेसूर चित्र भाऊबंदकीतील शेवटच्या स्वगतात कसे बोलके झाले आहे पाहा:

"या रामशास्त्र्याने अखेर येथेही दावा साधला अं! ह्या मेल्याचं नाव ऐकल्याबरोबर काय करू नि काय नको असे मला होऊन जाते, .....त्या गंगटीचा पोर पेशव्यांच्या गादीवर बसणार. नाना-बापूंच्या हाती सर्व अधिकार जाणार, आणि रामशास्त्र्यासारखे माथेफिरू आमची अप्रतिष्ठा सर्व आबालवृद्धांस सांगत सुटणार! नाही! माझ्याच्याने या गोष्टी सहन करवत नाहीत. माझ्या पोटात असणाऱ्या सवाई बाजीरावा, तुझ्या मातेचा हा विलाप कान देऊन ऐक; आणि तुझ्या शत्रूंचा पक्का सूड उगवण्याची तयारी एव्हापासून कर.......पाहिजे ते कर, कोणालाही बोलावून आण. पण आम्हांस पेशवाईस अंतरावयाला लावणाऱ्या बारभाईंची घरे जमीनदोस्त करण्यास चुकू नको. असा सूड उगविताना बारभाईबरोबर अखेर भाऊबंदकीमुळे महाराष्ट्र-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चेही वाटोळे करण्याचा प्रसंग आला तरी मागेपुढे पाहू नको,...असा तुला तुझ्या या आईचा गर्भावस्थेत उपदेश आहे. ”

स्वभावपरिपोष हा पात्रापात्रांच्या संघर्षांतून व त्यातून निर्माण होणाऱ्या घटनांतून होणे ही नाट्यवस्तूच्या श्रेष्ठपणाची कसोटी. पण मनाच्या अथांग कुहरात दडलेले कोणापाशीही बोलून न दाखवता येण्यासारखे विचार एकांतात पात्रांच्या मुखातून अभावितपणे बाहेर येतात. या दृष्टीने स्वगते वास्तवतेच्या चौकटीत बसू शकत नसली तरी ती नाटकात पुष्कळ वेळा अपरिहार्य असतात.

आणि अपरिहार्यता हीच स्वगताची खरी कसोटी. स्वगत अपरिहार्य असेल तरच नाट्यवस्तूचा एक अविभाज्य घटक ते बनू शकेल, एरवी नाही. शेक्सपियरने याच अपरिहार्य पद्धतीने स्वगतांचा मोठा चांगला उपयोग केला आहे. किंबहुना हॅम्लेट, मॅक्बेथ, ऑथेल्लो, लीअर, अँटनी अँन्ड क्लिओपात्रा यांतील स्वगतें काढून टाकली तर या नाटकांत एक मोठी पोकळी तर निर्माण होईलच; पण त्याशिवाय पात्रांची यथायोग्य समज श्रोत्यांना येणार नाही. स्वगत हे पात्राच्या मनात प्रेक्षकांना शिरकाव देते. हॅम्लेट व माधवराव, क्लिओपात्रा, व मस्तानी, मॅक्बेथ-राघोबा, यांच्या हृदयातील रणांगणावर होणाऱ्या उन्मत्त भावनांचे तांडव हे फक्त स्वगतांखेरीज कसे कळणार? स्वगते ही त्या पात्राच्या चमत्कारिक दिसणाऱ्या वर्तनाचे गूढ उकलून दाखवतात. मनातील वादळांची तीव्रता भयानक असते. 'There are greater storms and tempests than almanacs can report' असे एनोबार्बस म्हणतो. 'There is no art to see the mind's construction in the face' असे मॅक्बेथला वाटते. आणि हॅम्लेट—केवढी त्याची व्यथा; आणि कुणाला तो सांगणार : "O that I were born in a nutshell and count myself the king of infinite space were it not that I have bad dreams!" वडिलांचा खून, आई त्यात साथीदार, आणि वडिलांच्या उत्तरक्रियेबरोबर आईच्या दुसऱ्या लग्नाचा सोहळा. जीवनाची केवढी शोककथा! पण कसं बोलायचं? कुणाला सांगायचं? म्हणून तो स्वतःशीच म्हणतो--

> To be or not to be : that is the question.
> Whether it is nobler in the mind of suffer
> The stings and arrows of outrageous fortune
> Or to take arms against a sea of trouble
> And by opposing and them ?

हॅम्लेटप्रमाणेच सवाई माधवरावाची स्थिती, नागनाथाने भर दरबारात उच्चारलेले ते विषारी शब्द 'नानाच्या वशिल्याचा पेशवा' मनात रुजत असतानाच सासूच्या अनैतिकतेबद्दल व बायकोच्या अमंगल उत्पत्तीबद्दलचा संशय त्याचे मन भाजून काढते. जग ही घाणीने भरलेली बाग आहे असे हॅम्लेटला वाटते. घाणेरड्या पुण्यापासून दूर पळून जावे असे माधवरावालाही वाटते. त्याच्या मनातील हे द्वंद्व किती तीव्रतेने त्याच्या स्वगतात आले आहे :--

"मी पंतप्रधान की नाना पंतप्रधान? बाबासाहेब म्हणतात, नाना पंतप्रधान, तेच खरे!" आणि तिसऱ्या अंकाच्या शेवटचे हे स्वगत पाहा :--

"हा नीच पापी नाना काय करील आणि काय नाही याचा नेम नाही. या दुष्ट नानाचा आता मला इतका तिटकारा आला आहे की, याच्या पापी हातांनी पूजिलेली प्रत्यक्ष देवाची मूर्तीही मला पापमय वाटते."

डेस्डिमोनावरील ऑथेल्लोचे निस्सीम प्रेम आणि तिच्या व्यभिचारीपणाची घृणा—हा मानसिक संघर्षही खाडिलकरांनी एका दोन वाक्यांच्या स्वगतात उत्तम आणला आहे. वादळातून सुखरूप आल्यावर किनाऱ्यावर उभ्या असलेल्या प्रणयसुंदरीच्या दर्शनाने ऑथेल्लो समाधान मानतो. पण व्यभिचाराच्या शंकेने अधिक मोठे वादळ त्याच्या मनातच निर्माण होते. त्याचप्रमाणे यशोदाबाईचा हात लागल्यावर माधवरावाचे तप्त डोके शांत होते, पण तिच्या व्यभिचारी उत्पत्तीची कल्पना येताच तो स्वतःशी म्हणतो :

"असल्या या प्रेमळ जिवाची व्यभिचारापासून उत्पत्ती नको. त्या गोष्टीचा विचारच नको."

मनाच्या उत्कट, सुखकारक अगर व्याकुळ अवस्थेतूनच स्वगत जन्म घेत असल्याने बहुतेक स्वगते ही श्रेष्ठ काव्यगुणाचे उत्कृष्ट नमुने आहेत. शेक्सपियरच्या स्वगतांचा प्रेक्षकाच्या मनावरील चिरंतन मोहिनीचे रहस्य त्याच्या काव्यगुणांतच आहे. त्या काव्यात पात्रांच्या मनाच्या पाकळ्या खुलतात, फुलतात, कोमेजूनही जातात. मन केवळ काव्यमय असल्याने स्वगताला कायदेशीर स्थान नाटकात असणार नाही. गडकऱ्यांची प्रतिभा सर्वत्र संचार करणारी. पण 'प्रेमसंन्यास'मधील प्रत्येक पात्र



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्वगतात काव्यातच बोलते. संवादातील हा सार्वत्रिक काव्यव्यवहार दोषास्पदच म्हणावा लागेल. कमलाकर, सुमन, लीला, जयंत सर्वच कवी दिसतात. आणि विसरभोळा गोकुळ विसरभोळेपणावरही उत्तम काव्य बोलण्यास विसरत नाही. स्वगत काव्यमय असले तरी अस्थानी कसे होते हे कमलाकराच्या स्वगतावरून दिसून येईल. कमलाकर हा सुशिक्षित दरवडेखोर. एका स्वगतात तो संध्याकाळचे वर्णन करतो पण संध्याकाळचे रमणीय सौंदर्यही त्याच्या खुनी मनाचा रंग घेऊन त्याच्या स्वगतातून बाहेर पडते :-

" अहाहा ! या वर्षाकालीन संध्यासमयाची किती भीषण रमणीय शोभा ! गगनमार्ग चालण्याच्या श्रमाने उरी फुटल्यामुळे सूर्याने रक्ताची गुळणी टाकून नुकताच प्राण सोडला आहे. रक्ताने भरलेल्या या त्याच्या मृत्युशय्येवर हा सोसाट्याचा वारा ढगाचा शेणगोळा फिरवीत आहे. "

त्याच्याजवळ माणुसकीचा ओलावा नाही; विवेकाची टोचणी नाही; विचाराची साक्ष नाही. वसुंधरेचे पातिव्रत्य नाहीसे करण्याचा निश्चय वृंदावन करतो, पण तो उदात्त वसुंधरेच्या डोळ्यांकडे सरळ नजर ठेवू शकत नाही. वसुंधरेच्या दिव्य दर्शनाने, तिच्या पुण्यप्रभावाने आपल्या ( त्याच्या ) हृदयात असलेला सुप्त परमेश्वर जागा होतो. पापाची वाट अलौकिक पुण्याकडे जाते. पण कमलाकराला परमेश्वराचे दर्शन होत नाही. कारण परमेश्वराचे अधिष्ठान जिथे असते ते हृदयच तो जन्मापूर्वी परमेश्वराजवळ विसरून आला.

परंतु स्वगत हे काव्यमय असण्यापेक्षा ते नाटकात अगत्याचे असणे आवश्यक आहे. शेक्सपियरची स्वगते कथानकाशी एकरूप झाली, म्हणून त्याचे मूल्य. नाट्यवस्तूशी प्रत्येक स्वगताचा अतूट संबंध असला पाहिजे, तर स्वगताच्या अस्तित्वाला अर्थ राहतो.

खाडिलकर-गडकरी यानंतरच्या आधुनिक रंगभूमीवरची शेक्सपियरची पकड किंचितही कमी झालेली दिसत नाही. नवजीवन प्रयोग व तंत्र येऊनही शेक्सपियरचा प्रभाव कायमच आहे. यातच त्याच्या शाश्वत नाट्यमूल्यांचे यश आहे. गेल्या पाच दहा वर्षांत शेक्सपियर पुन्हा नवे रूप धारण करून आलेला दिसतो. नाना जोगाचा ' तीन अंकी हॅम्लेट ', शिरवाडकरांची ' राजमुकुट ' व ' ऑथेल्लो ' ही शेक्सपियरच्या स्थलकालातील मोहिनीचीच विलोभनीय प्रतीके आहेत. याही कालखंडात शेक्सपियरचे नाट्यतंत्र किती प्रभावीपणे आपल्या नाटककारांनी आत्मसात केले आहे याचे फार चांगले उदाहरण म्हणजे शिरवाडकरांची करुणरम्य अशी ' दुसरा पेशवा ' ही शोकान्तिका. शोकान्तिकेची ही देणगी ही मूळची शेक्सपियरचीच म्हणायला हरकत नाही. दिल्ली-लाहोरचे शहरकोट व काबूल-कंदाहारची सिंहासने ज्याच्या धाकात भेदरून जात असा बाजीराव या नाटकाचा नायक, त्याच्या पराक्रमावर प्यार झालेली मस्तानी ही नायिका. तो पराक्रमाचा राजा : ती लावण्याची सम्राज्ञी. त्यांच्या अपरंपार प्रेमात-त्यांच्या त्यागात अँटनी-क्लिओपात्राच्या प्रेमाचे धुंद स्वर ऐकू येतात. ' We have kissed away Kingdoms and Empires. ' असे अँटनी म्हणतो तर बाजीरावाचे उद्गार पाहा, " मस्तानी जवळ नसल्यावर पराक्रम कुठचा आणि जीवन तरी कुठचे !... माझ्या शिरावरील सर्व जबाबदाऱ्या मी झुगारून देईन, पण मस्तानीला मी माझ्यापासून दूर करणार नाही. " सर्व वातावरण कसे इष्काच्या नशेने धुंद झाले आहे.

या नाटकातील बाजीराव मस्तानी यांची दोन स्वगते पाहा. त्यात उत्तम काव्य आहे, उत्कट भावना आहे, मनाच्या खोल गाभाऱ्यात घुमणारे भावनामधुर संगीत आहे आणि दृश्य मर्यादेपलीकडील अनंत अज्ञानाचे तरंग उठवणारी सूचकताही आहे. मस्तानीपासून दूर अशा नर्मदेच्या काठच्या छावणीत बाजीराव जीविताचे शेवटचे क्षण मोजीत आहे :—

" एकांत मिळावा म्हणून मी सगळ्यांना जायला सांगितले. पण हा एकांत, अंतःकरणाचा हा एकटेपणाच माझे जीवन कोरून काढीत आहे. सरदारांच्या गर्दीत सतत राहणारा, सैनिकांच्या समुदायात वावरणारा, आप्तमित्रांनी वेढलेला महाराष्ट्राचा हा पंतप्रधान आज एकटा, अगदी एकटा पडला आहे. पर्वताचा एखादा सुळका इतर शिखरांना मागे सारून आकाशात उंच जातो. पण त्या उंचीबरोबरच, त्या श्रेष्ठतेबरोबरच, त्या नभकास निळ्या पोकळीतील एकाकीपणा त्याला सहन करावा लागतो. हा एकाकीपणा म्हणजे मरणाच्या आगमनाची चाहूल आहे. कालपुरुषाची ही सावली आहे....

"......संपलं, सारं काही संपलं; जीवन या नावानं ओळखलं जाणारं सुखदुःखांनी भरलेलं हे मधुर व कठोर स्वप्न समाप्त झालं ! विश्रांती न घेता मारलेल्या दूरवरच्या मजला, निष्ठावंत सैनिकांचा सहवास, घरातल्या माणसांचं निस्वार्थी प्रेम, स्त्रियांच्या मखमली शरीराचा उन्मादक





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्पर्श,...दिवसभर फुललेल्या कमलाच्या या कोमल पाकळ्या आता मिटू लागल्या. दूरवर राहिलेल्या माझ्या प्रिया, पुण्यशील महाराष्ट्रा, नर्मदेच्या तीरावरून हा बाजीराव तुला अखेरचा प्रणाम करीत आहे. ''

हे स्वप्न म्हणजे बाजीरावाच्या उदात्त जीवनाच्या महासागराचे सार. आणि मस्तानी–चांदण्याच्या रुपेरी सागरात नौका घालून एखाद्या यक्षलोकातून आलेली ही रूपवती. तीही आपल्या प्रियकराला भेटण्यास निघाली आहे. अँटनीला भेटायला जाणारी क्लिओपात्रा त्याला सांगते ' My husband, I come ' ती उत्तम राजवस्त्रे परिधान करते. कारण तिच्या मनात अमर आशा प्रस्फुरित झाल्या आहेत. मरणापूर्वीच्या क्लिओपात्राच्या भाषणातील तिचे प्रेम, मरणाच्या भीतीचा अभाव, मरणाच्या दारातूनच पलीकडे दिसणारे प्रियकराच्या मीलनाचे सुख मस्तानीच्या शेवटच्या स्वगतात कसे मूर्तिमंत उभे आहे....

'' जाते मी...असे कष्टी होऊ नका. आसवे गाळू नका, अमोल आनंदाची घटका आहे ही! आनंद...आनंद भरला आहे सगळ्या दिशांतून, मोहरलेल्या मांडवाखालून एखाद्या सुगंधाच्या लहरीसारखी मी चालले आहे. आले मी... सरकार...मी आले....चला, खाविंद, आपल्या अनंत प्रवासाला सुरुवात झाली. पांढरा शुभ्र पोषाख करून आपण आपल्या आवडत्या अबलख घोड्यावर स्वार व्हा...मी तुम्हाला आवडणारा पोषाख करून माझ्या सारंगवर स्वार होते!...झालात स्वार? चला...मोत्यासारख्या चांदण्या-तून...रुपेरी मेघावरून ... तारकांची फुलं खुडीत ... क्षितिजावरील किनखापी झालरी बाजूला सारीत...माझ्या बाजीरावा, आपण दोघे...आपण दोघं...तुफान...वे... गा...ने...... ''

काव्य...भावना...उत्कटता...आत्मसमर्पण ... केवढा विलक्षण संगम! कोणत्याही नाट्यप्रसंगाने या एका शेवटच्या स्वगतातील मस्तानीच्या अपरंपार प्रेमाचा प्रत्यय आणून दिला नसता. काव्यावर स्वार होऊन, मंगल भावनेचा लगाम धरून अनंताच्या प्रवासास निघालेले बाजीराव व मस्तानी जगातील महन्मंगल शाश्वत प्रेमाची अमर प्रतीके आहेत. एक उत्कट स्वगत हा चमत्कार करू शकते. शेक्सपियरने हा चमत्कार करून दाखवला. मराठी रंगभूमीने शेक्सपियरचे साद-पडसाद डोळसपणे टिपून घेतले.

( आकाशवाणी, पुणे यांच्या सौजन्याने )

* * *

म. वि. जोशी

# माझे दादा

# ( कै. चिं. वि. जोशी )

[ प्रा. चिं. वि. जोशी यांचे २१-११-१९६३ रोजी दुःखद निधन झाले. त्यांच्या कनिष्ठ बंधूंनी त्यांच्या सांगितलेल्या काही आठवणी चिंतामणरावांच्या व्यक्तिवैशिष्ट्यांची चांगली कल्पना देतील. ]

ती. दादांचे प्राथमिक शिक्षण आरंभी हुजुरपागेतील प्रॅक्टिसिंग स्कूलमध्ये दोन इयत्तांपर्यंत मिस हर्टफर्डबाईंच्या हाताखाली झाले. साठ वर्षांपूर्वी ह्या शाळेत मुलगेही घेत असत. ह्या वृद्ध इंग्रज स्त्रीच्या खांद्यावर चढण्याचा खेळकर-पणा त्यांना लाभला होता. हल्ली या शाळेचे दार दक्षिणेकडे आहे. पूर्वी पूर्वेकडे असे. मुख्य इमारत मधोमध होती. वरच्या मजल्यावर मिस हर्टफर्डबाईंची राहावयाची जागा व कचेरी असे. सोगा जमिनीवर लोळणारा, बाह्या मनगटापर्यंत आणखी कॉलर पार हनुवटीपर्यंत असा त्यांचा काळाभोर पोषाख असे. त्यांच्या कडेखांद्यावर चढून शाळेतली पोरे मोठ्या खुशीत असत. आवडनावड प्रत्येकाला असतेच म्हणून मिस हर्टफर्ड यांच्या आवडत्या मुलांत दादा असत. मराठी दुसरी संपली की मुलग्यांना ही मुलींची शाळा सोडावी लागे. त्याप्रमाणे तिसरीपासून दादा नूतन मराठी विद्यालयात जाऊ लागले. १९०९ मध्ये मॅट्रिक होईपर्यंत त्याच शाळेत दादांचे शिक्षण झाले. ह्या सबंध काळात आमचे वडील कै. विनायक रामचंद्र जोशी ' सुधारक ' पत्राचे संपादक असल्याने गावातील साऱ्या प्रतिष्ठित लोकांत जाणे येणे असे. आता ज्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जागेवरून शिवाजी रोडला लक्ष्मी रोड काटतो त्या ठिकाणी असलेल्या तिमजली इमारतीत 'सुधारक' पत्राचे ऑफिस असे. येथे सुधारक पक्षाचे पुण्यातील सारे लोक सकाळ संध्याकाळ वर्तमानपत्रे वाचावयास आणि गप्पा मारावयास जमत. काही काम निघाले की आम्हीही तेथे जात असू आणि तेथे आमचे फार कौतुक होई. ही जमणारी मंडळी सुसंस्कृत असल्याने मुलांनी ऐकू नयेत अशा गोष्टी किंवा भाषा तेथे चालत नसल्याने लहानपणापासूनच दादांच्या मनावर चांगले संस्कार होत गेले. जमणाऱ्या लोकांत कै. प्रो. पानसे, कै. प्रो. काळे, कै. चिटणीस वकील, कै. गांधी वकील, कै. हरिभाऊ आपटे अशी संभाषणपटू माणसे असल्याने साहजिकच ऐकून ऐकून मजेदार बोलणे दादांस येऊ लागले. पुण्यातील लोकांत तेव्हा दोन तट असत, त्यांपैकी एका तटाचा 'सुधारक' ऑफिस हा बालेकिल्लाच होता. हा तट अल्पसंख्य असल्याने प्रतिपक्षावर मात करताना उपहासाचा अवलंब करण्याची लकब साऱ्यांच्याच रसवंतीत उतरली होती. दादांची विनोदबुद्धी अशा अनुकूल वातावरणात जोपासली गेली होती.

दादांच्या शिक्षणक्रमाचे तीनही टप्पे ते १९१३ मध्ये बी. ए. झाल्याने संपले. १९१४ च्या जानेवारीपासून त्यांनी न्यू इंग्लिश स्कूल, नेटिव्ह इन्स्टिट्यूशन व सेंट जॉन्स स्कूल अशा तीन शाळांत पाली शिक्षकाचे काम पत्करले. १९१६ मध्ये एम्. ए. झाल्यावर त्यांना उमरावतीस नोकरी लागली. रत्नागिरीस नोकरीवर जाईपर्यंत म्हणजे १९१८ पर्यंत ते उमरावतीस होते.

त्यांच्या अगदी बालपणातील एक ऐकीव प्रसंग म्हणजे सोडावॉटरची बाटली फोडण्याचा. "यानेच बाटली फोडली." आजोबा म्हणाले. "भाऊ, मी नाही फोडली काही. माझ्या हातांतून पडेपर्यंत नीट होती. जमिनीवर पडली तेव्हा ती आपणच फुटली. मी काही केलं नाही तिला."

१९०२ च्या सुमारास आमची आजी गेल्यानंतर आमची आई दादांना आणि मला घेऊन सोलापुरास आमच्या आजोबांकडे राहात होती. भाऊंच्याकडे रोज संध्याकाळी बिझिक खेळण्यास पै नावाचे मुनसब येत असत. नव्या पेठेत हे घर असून गॅलरीत उभे राहिले की पैंची भव्य मूर्ती आम्हांस दिसे. मग दादा भाऊंना सांगत, "भाऊ, पै आले." एके दिवशी दादांनी भाऊंना ओरडून सांगितले. "भाऊ, आज पैसा आला!" "हं! असं बोलू नये माणूस लठ्ठ असला म्हणून!" भाऊंनी बजावले. त्यावर दादांनी उत्तर दिले, "भाऊ, तुम्हीच बघा की! खरंच पैसा येत आहे तो." "काय म्हणतोस रे?" असे उद्गारत भाऊंनी बाहेर पाहिले. मुनसब पै आपल्या दोन नातवांना घेऊन येत होते. "पाहा भाऊ, तीन पै म्हणजे एक पैसा." कोष्टक पाठ केल्याच्या आवाजात दादा म्हणाले.

ह्यानंतर काही महिन्यांनी आम्ही पुण्यास येत होतो. नित्याप्रमाणे खिडकीबाहेर तोंड काढून दादा आगगाडीत बसले होते. बाकावर भाऊ आडवे झाले होते. स्टेशन येताच दादा आपल्याशीच मोठ्याने बोलले, "काना पुसला तर फार वाईट." "काय म्हणतोस रे?" असे भाऊंनी विचारले. "तुम्हीच बघा ना, भाऊ." खिडकीबाहेर बोट दाखवीत दादा म्हणाले. भाऊंनी प्लॅटफार्मवरच्या पाटीकडे बघितले. स्टेशनाची पाटी होती ती आणि स्टेशनाचे नाव होते "माढे". या 'मा' चा काना पुसला तर, असा अर्थ!

पुण्यातील नव्या विष्णूचे मंदिर आमच्या पणजोबांनी बांधले. ह्या देवळात प्रत्येक एकादशीला आणि सणाला कीर्तने होत. चातुर्मासात तर रोज कीर्तन असे. गोकुळअष्टमी आणखी देवळाच्या स्थापनेचा वाढदिवस असे उत्सव होत. आम्ही घरचेच मुलगे म्हणून आमचे फार कौतुक होई. आम्ही एकही कथाकीर्तन चुकू देत नव्हतो. कथा आटोपताच बुवा काही वेळ जमलेल्या मंडळींत गोष्टी करण्यात घालवीत. दादांनी एकदा बुवांस विचारले, "बुवा, तुम्ही मघाशी सांगितले की, कृष्णाने यमुनेच्या डोहात उडी घेऊन कालियाशी युद्ध केले, तेव्हा कालियाच्या स्त्रियांनी श्रीकृष्णास ओवाळले. बुवा पाण्यात निरांजन कसे पेटले हो?"

नरसिंहाचे आख्यान लावले तेव्हा बुवा म्हणाले होते, "जेव्हा प्रल्हादास हिरण्यकश्यपूने ठार करण्यास उभे केले तेव्हा प्रल्हादाने परमेश्वराचा धावा करताना म्हटले, "हे देवा, हे रामा, हे कृष्णा, माझे रक्षण कर." हे ध्यानात ठेवून दादांनी बुवांस विचारले, "ही गोष्ट झाली नरसिंह अवतारी. त्या वेळी राम आणखी कृष्ण असे अवतार झालेच नसता प्रल्हादाने रामाचे किंवा कृष्णाचे नाव घेतलेच कसे!" बुवा उत्तर काय देणार!

महाराणी व्हिक्टोरिया आणि न्या. रानडे या दोघांचे मृत्यू अगदी थोड्याच अंतराने झाले. वडिलांच्याकडे येणाऱ्या लोकांच्या नेहमी चालणाऱ्या संवादांमुळे सार्वजनिक बातींत बडबड करण्याची आम्हालाही सवय लागली होती. दादांनी मला विचारले, "रानडे मेल्यामुळे तुला वाईट वाटते का



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" राणी मेल्यामुळे ? " रानडे आम्हांला निकट वाटत म्हणून मी उत्तर दिले. " रानडे मेल्यामुळे ! " दादांनी हेच उत्तर अपेक्षिले होते.

मासिक ' मनोरंजना ' मध्ये " दुःखांती सुख " नावाची कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होत होती. ' सुधारक ' पत्रामुळे सारी मासिके व वर्तमानपत्रे आमचे घरी येत. एके दिवशी आमच्या वडिलांना दादा म्हणाले, " आप्पा, ह्या गोष्टीची भाषा वासुदेवरावांची दिसते." कै. वासुदेव गोविंद आपटे आमच्याकडे नेहमी येत असत. तरी एवढ्या लहान मुलास वाचनात आलेली कोणती भाषा कोणाची हे कसे कळते, हा चमत्कार आप्पांना वाटला व त्यांनी तसे बोलूनही दाखविले. दादांनी आपल्या विधानाचा पुरावा हजर केला. " आठवड्याच्या अखेरीस—शनिवारी—निम्मी सुट्टी देण्यापेक्षा मध्यभागी म्हणजे बुधवारी शाळेला अर्धी सुट्टी द्यावी अशी तरफदारी ह्या गोष्टीत केली आहे—अशी पद्धत फक्त नूतन मराठी विद्यालयातच आहे. वासुदेवराव त्याच शाळेत मास्तर आहेत—त्या अर्थी ही गोष्ट वासुदेवरावांनीच लिहिली आहे. " दादांचे तर्कशास्त्र खरे ठरले. मिसेस हेन्री वुडच्या " मिसेस हॅलिबर्टन्स ट्रबल्स " व " ईस्टलिन " या कादंबऱ्यांची रूपांतरे कै. आपटे यांनी ' दुःखांती सुख ' आणि ' माणिक बाग ' या नावांची केली होती.

दादांच्या अंगात साळसूदपणे खोडकरपणा करण्याची वृत्ती बाळपणापासूनच होती. १९०७ चे सुमारास शाळांनी सरकारी ग्रँट घेण्यासंबंधी काही नवे निर्बंध लादण्यात आले होते. " चतकोर भाकरीसाठी गुलामगिरी " ह्या शीर्षकाखाली ' केसरी 'मध्ये एक लेख आला होता. या संदर्भात दादांनी " एक विद्यार्थी " ह्या सहीने ' ज्ञानप्रकाशा 'त एक पत्र प्रसिद्ध केले होते. नूतन मराठी विद्यालयाने या नव्या निर्बंधापुढे मान तुकविली होती—न्यू इंग्लिश स्कूलने मात्र मान ताठ ठेवली होती. ह्याचा उल्लेख त्या पत्रात होता. ही गुप्त बातमी कोणासच ठाऊक नव्हती. आमच्या घरी पुष्कळ मित्र जमत व त्यांच्यात ऊहापोह झाला की ' एक विद्यार्थी ' ही सही खोटी असली पाहिजे, नाही तर विद्यार्थी तरी उद्धट असला पाहिजे.

ह्याच सुमारास दारूविरुद्ध पहिले पिकेटिंग चालू झाले. अशा चळवळीत विद्यार्थ्यांनी पडू नये असा आमच्या वडिलांचा कटाक्ष असे—व त्याची अंमलबजावणी शिक्षणासाठी आमच्या घरी राहात असलेल्या भाच्यावरच आपल्याकडून ते कसोशीने करीत; खात्री ही की असल्या फंदात निदान घरचे कोणी पडणारा नाही. परंतु सहज ओळख पटविण्यास लावणारी हिरवी टोपी घालून पांजरपोळाच्या बोळासमोरल्या गुत्त्यापुढे दादा निःशंकपणे रोज संध्याकाळी पिकेटिंग करीत. गुत्तेवाला पारशी जवळच्या मराठ्यांच्या वाड्यात राहात असे. त्यामार्गे आमच्या आत्याबाईंनी ही बातमी आणली होती.

१९११ चा दिल्ली दरबार झाला त्या प्रसंगी गावोगावी घडलेल्या वा घडविलेल्या समारंभांची भडक बातमीपत्रे ' ज्ञानप्रकाशा 'त येत. ही खरी की खोटी अशी आम्हांला शंका आली. शंकेचे निराकरण आम्ही कट रचून केले. आप्पांचे आजोळ म्हणजे अकोळनेरचे जहागीरदार दाभोळकर हे. तेव्हा दादांनी असला दरबार समारंभ अकोळनेरला झाला असे कल्पून त्याचा बनावट अहवाल खोट्या बातमीपत्राने ' ज्ञानप्रकाशा'ला पाठविला. तिकिटासाठी दोन पैसे पडले असते म्हणून संपादकांच्या नावाचे पाकीट आम्हीच किबेवाड्यावरल्या पेटीत टाकून आलो. खूण पटावी म्हणून ह्या बनावट रिपोर्टात आमच्या साऱ्या नातेवाइकांची नावे गोवून दिली होती. पत्र प्रसिद्ध झाले, दरबारची बातमीपत्रे पुष्कळशी रचलेली असत हे सिद्ध झाले. अन्य कारणाने ह्या पत्राचा बोभाटा जिल्ह्याच्या कलेक्टरांच्या कानी गेला होता हे पुढे आम्हांला समजले.

पुण्याच्या जुन्या स्टेशनावर तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचे फार हाल होत. गाडी सुटण्याची ऐन वेळ होईपर्यंत आत जाऊच देत नसत. अर्धा आणा टाकून प्लॅटफॉर्म तिकीट घेऊ म्हटले तर बरोबरचे सामान अडवीत. आमच्या आईला घेऊन दादा नरसोबाच्या वाडीला निघाले होते. आई होती आजारी. तशी दादांनी एक घोरपडीचे सेकंड क्लासचे व एक प्लॅटफॉर्मचे अशी तिकिटे घेतली. तिकीट कलेक्टराने आत शिरताना प्रश्न केला, " तुम्हाला कोठे जावयाचे आहे ? " दादांनी उत्तर केले, " घोरपडीला. " गाडी गाठल्यावर दादा व आई थर्ड क्लासमध्ये बसलेले पाहून त्याच तिकीट कलेक्टराने पुनः तिकिटे तपासली. गावातच घेतलेली पहिली तिकिटे दादांनी दाखविली तशी तो म्हणाला, " अहो, ही तर आहेत नरसोबाच्या वाडीची अन् तुम्ही घोरपडीला जावयाचे आहे असे खोटेच का सांगितले मघाशी ? " दादांनी उत्तर केले, " अहो मास्तर, आम्ही प्रथम घोरपडीलाच जाणार, मग सासवडरोडला, मग तुमच्या आळंदीला, असे करीत करीत नरसोबाच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वाडीपर्यंत जाणार. कळलं ? " " **आमच्या** आळंदीला काय ? " कटदिशी चिमटा वाजवीत तिकीट कलेक्टर गुरगुरला. ह्या आळंदीला चोराची आळंदी म्हणतात, दुसरी आहे ती देवाची.

पन्नास वर्षांपूर्वीचे प्रसिद्ध मराठी लेखक बालबोधकर्ते कै० विनायक कोंडदेव ओक हे आमच्या आत्याबाईंचे सासरे. त्यांना दादांच्या लेखनगुणाबद्दल फार कौतुक असे. ओक मंडळी लग्नासाठी पुण्यास आली असता आमचे आतेभाऊ कै. डॉ० ओक दादांना थट्टेने म्हणाले, " तुझ्या दीडपट शहाणपणा माझ्या अंगी आहे. " एल्. एम्. अँड एस्. हा तीन वर्षांचा कोर्स डॉ० ओकांचा झालेला होता व दादा दोन परीक्षा देऊन इंटरमीजिएट पास झाले होते. बे दीडे तीन असा हा हिशेब होता. पण दादांनीं हजरजबाबीपणाने डॉ० ओकांच्या अंगावर बाजू उलटविली. " तूं दीडपट हे खरेच, पण मी युनिट हेही खरे. " हा कोटिक्रम ऐकून कै० विनायक कोंडदेव ओक पोटभर हसले होते.

उन्हाळ्याचे दिवस. दादा, मी व आणखी दोघेजण तुळशीबागेच्या बोळातील आईस्क्रीमच्या दुकानात योग्य कारणासाठी गेलो होतो. क्रॉफर्ड प्रकरणातील सेवानिवृत्त मामलेदार कै० रा. सा. विष्णु अनंत पटवर्धन त्याच दुकानात आईस्क्रीम चाटीत बसले होते. हजामत केलेले दादांचे डोके पाहून असल्या जुनाट माणसाला खिजवण्यास संधी मिळाली असे समजून, दुकानदाराला त्यांनी म्हटले, " काय रे गणपती, आज किती अंडी घातली आहेस रे आईस्क्रीममध्ये ? " त्यांचा खवचटपणा ध्यानी येऊन दादांनी रावसाहेबांचेच आईस्क्रीम बनविले. दादा म्हणाले, " रावसाहेब, चुकता आपण. अंड्यांचं आईस्क्रीम असं नाही लागत; ह्यापेक्षा चांगलं लागतं ! "

दादांना रत्नागिरी हायस्कूलमध्ये नोकरी लागली. त्या काळी मोटार सर्व्हिस नव्हती. मेमध्ये बोटी बंद होत. रत्नागिरीस जाण्यासाठी दादांनी कोल्हापुराहून बैलगाडी केली होती. तेवढ्या प्रवासास तीन दिवस लागत. साखरप्याला रात्रीचा मुक्काम खाणावळीच्या मांडवात पडला होता. रात्रीच्या पंगतीला मामलेदार स्वारीवर होते ते बसले होते. बालगंधर्वांच्या ऐन भरभराटीचा तो काळ होता. त्यांचे कौतुक, त्यांचे वैभवप्रदर्शनाचे वर्णन चघळीत बसणे सर्वांना आवडे. पंगतीतल्या एकाने कौतुकाने सांगितले, " अहो, नारायणरावांना आता महिन्याला हजार रुपये पडतात. " मामलेदार रावसाहेबांना या वैभवाचा हेवा वाटला. विषादाने रावसाहेब म्हणाले, " म्हणजे काय हा वेडेपणा ! अहो मामलेदारालासुद्धा एवढी प्राप्ती होत नाही ! " उद्देश हा की नाटक्याला एवढे पैसे कशाला मिळावे ! दिसण्यात बावळट वाटण्याइतक्या साधेपणाने दादा वागत असल्याने साहजिकच त्यांच्याकडे दुर्लक्ष केले जाई. जेवताना सदरा काढावयाचा त्यांचा नेम असे. रावसाहेबांनी केलेली बालगंधर्वांची हेटाळणी न रुचून साऱ्या पंगतीला ऐकू जाईल अशा मोठ्या आवाजात दादांनी गोळी मारली. " पण रावसाहेब, तुम्ही हे ध्यानात नाही आणीत की प्रत्येक तालुक्याला निदान एकेक मामलेदार पडलेला आढळतो — पण साऱ्या मराठी मुलखात एकच एक बालगंधर्व आहेत. त्यांना एक हजार रुपये म्हणजे जास्ती नव्हेत ! " पंगतीतल्या बारा नंबरावरच्या माणसाने हाणलेला टोमणा दुःसह होऊन रावसाहेबांनो " कोण हो हा ? " अशा अर्थी शेजाऱ्याकडे पहात कपाळास आठ्या घालून भिवया उडवल्या. त्यावर दादांनीच अनाहूतपणे माहिती दिली. " मामलेदार तयार करण्याचा कारखाना, पटवर्धन हायस्कूल, रत्नागिरीला आहे ना, तेथला मी कारागीर, कामावर चाललो आहे. "

भोळेपणाचा आव आणून साळसूदपणे दुसऱ्याला बारीक चिमटे घेण्याची अवगत असलेली कला पूर्वीच्या ' विविध-वृत्ता 'ला वेळोवेळी त्यांनी लिहिलेल्या पत्रांमधून दिसे. कै. पांगारकरबुवा हे कट्टे पुराणमतवादी ब्राह्मण कै. वाकसकर या कायस्थप्रभूंच्या घरी जेवावयास गेल्याची समक्ष घडलेली हकीगत दादांनी चव्हाट्यावर आणली. त्यावर बुवांनी केलेली दुधखुळी मल्लीनाथी मराठी वृत्तपत्रसृष्टीत इतकी गाजली की त्याचा प्रतिध्वनी ' टाइम्स ऑफ इंडिया 'च्या करंट टॉपिक्स या सदरात उमटला. त्यात दादांना " पक् ऑफ प्रोफेसर फ्रॉम बडोदा " ही पदवी दिली होती. दादा हे कै. सयाजीराव महाराजांचे एकनिष्ठ चाहते होते. विलीनीकरणानंतर ' टाइम्स 'ने लिहिले होते की, " बडोद्याचे राज्ययंत्रण आता भोवतालच्या मुलखाच्या पातळीइतके वर येईल. " त्यावर दादांनी त्याच पत्राला उत्तर देऊन विचारले की, " पातळी इतके वर की खाली ? " समाधान असे की हे पत्रसुद्धा ' टाइम्स 'ने प्रसिद्ध केले होते.

रा. श्रीकृष्ण चिंतामण चिटणीस नावाचे अत्यंत आनंदी व मनमिळाऊ गृहस्थ वकिलीचा अभ्यास करीत असता आमच्याकडे नेहमी येत असत. हल्लीच्या शेतकी कॉलेजाच्या मागे रेल्वे लाईनला लागून पांडरे नावाच्या शेतकऱ्याची

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विहीर आहे. तीत या चिटणिसांनी आम्हांला पोहावयास शिकविले. दादा पोहण्यात चांगले पटाईत झाले. इतके की १९२७ मध्ये बडोद्यास जलप्रलय झाला त्या प्रसंगी दादांनी ह्या विद्येच्या जोरावर गळ्याइतक्या पाण्यात उडी घेऊन स्वतःचे कुटुंबियांचेच नव्हे तर इतर शेजाऱ्यापाजाऱ्यांचे प्राण वाचविले. या जलप्रलयाची साग्र हकीगत पुष्कळ पत्रांमधून त्यांनी 'ज्ञानप्रकाशा'त प्रसिद्ध केली. चालू प्रसंगाची संगतवार हकीगत, स्थायी स्वरूपाच्या स्थलवर्णनाशी बेमालूम जुळवून कशी लिहावी याचा उत्कृष्ट नमुना म्हणून त्यांची ही वातमीपत्रे अवश्य अभ्यासावी.

पुण्याला "पूना मेल" नावाचे दैनिक निघत असे. त्यात दादा पुष्कळदा लिहीत. हिंदु-मुसलमानांचे ऐक्य या विषयावर त्यांचा एक उत्तम लेख यहुद्यांच्या मालकीच्या या पत्रात आला होता.

लेखनाचे बाळकडू त्यांना घरचेच होते. आमचे वडील आप्पा हे 'ज्ञानप्रकाशा'चे आरंभी इंग्रजी बाजूचे संपादक होते. पुढे दहा-पंधरा वर्षे ते 'सुधारका'चे संपादक होते. 'मासिक मनोरंजना'त आणि 'केरळकोकिळा'त त्यांचे पुष्कळ लेख आले होते. जॉर्ज इलियट यांच्या 'रोमोला' कादंबरीचे रूपांतर 'केवळ स्वार्थापायी' या नावाने मनोरंजक ग्रंथ प्रसारक मंडळीने (कै. काशीनाथ रघुनाथ मित्र यांनी) प्रसिद्ध केले. आमचे दोघे मामा ती. नारायण गंगाधर लिमये (नानूमामा) आणि ती. गोपाळ गंगाधर लिमये (गोपूमामा) हे साधारण दादांच्या वयाचे असल्याने साऱ्यांचे चांगले मेतकूट असे. आमचे हे लिमये आजोळ घराणे फार हौशी व कर्तृत्ववान आहे. नानूमामा व गोपूमामा यांना लहानपणापासून नाना हिकमती लढवून स्वतःस आणि भोवतालच्या मुलांमाणसांस रमविण्याचा छंद आहे. त्यांची ती चित्रे काढणे, रंगविणे, कसरती करणे, जादूचे खेळ, मॅजिक लँटर्न दाखविणे, नाट्यप्रवेश बसविणे, वाद्ये वाजविणे ही आठवली म्हणजे 'आयुष्य हे जगण्यासाठी' हा अलीकडील मंत्र आमच्या मामांनी पन्नाससाठ वर्षांपूर्वीपासून अवलंबिला याची खात्री पटते. त्यांच्या ह्या अनेकविध उद्योगांपैकी एक म्हणजे वर्तमानपत्रे व मासिके काढणे (आणखी बंदही करणे) हा असे. त्यांच्या एका पत्राचे नाव होते 'विदूषक' व एका मासिकाचे नाव होते 'विनोद'. नेहमी नेहमी 'वर्ष पहिले, अंक पहिला' याचा वीट आला म्हणून एकदा तर 'वर्ष तिसरे, अंक तेरावा' अशानेच सुरुवात केली होती. ह्या हस्तलिखितांचे एक लेखक व चित्रकार दादा असत.

कै० वासुदेव गोविंद आपटे यांचे 'आनंद' मासिक सुरू झाल्यावर त्यांच्याकडील पुस्तके, चित्रे, पाहण्यासाठी आम्ही त्यांच्या घरी म्हणजेच 'कार्यालयात' जात होतो. हा शब्द त्यांनीच पाडला. त्यांच्या प्रोत्साहनाने दादांनी "भूतदयेचे बक्षीस" ही गोष्ट लिहिली व ती 'आनंदा'त आलीही. अशा रीतीने लेखनाचा आरंभ कै० आपटे यांच्या प्रोत्साहनाने झाला. त्यांच्याजवळच्या विलायती मासिकांतून पाहिलेल्या चित्रपट्ट्यांवरून कल्पना उचलून दादा आपल्या जवळच्या खाजगी वह्यांमध्ये गोष्टरूपी चित्रपट्या काढीत. वाघाच्या शिकारीस एक गब्रू गेला आणि झाडाच्या आडव्या फांदीवर जाऊन बसला. वाघाने झेप घेताच फांदी कडाडली. शिकारी जो आपटला तो नेमका वाघावर स्वारासारखा. आता वाघ घाबरला व पळू लागला. गावकऱ्यांना हा चांगदेवाचा अवतार वाटला—ही गोष्ट दादांनी आठ चित्रे काढून रेखाटली होती.

स्वतः भावनापूर्ण असून भावनांच्या आहारी दादा कधीच गेले नाहीत. दादांच्या इंटरमीजिएट परीक्षेच्या निकालाची तार प्रार्थना समाजाचे कै. द्वारकानाथ गोविंद वैद्य यांचेकडून 'सुधारका' चे पत्त्यावर मागविली होती व ती घेण्यास बारा वाजल्यापासून दादा तेथे गेले होते. दुपारी एकाचे सुमारास आप्पा ऑफिसमध्ये गेले तेव्हा शांत चित्ताने दादा हॉलमध्ये येरझारा घालीत होते. आप्पांनी साहजिकच तर्क केला की, तार अजून आलेली नसणार. कोट, पगडी काढून आप्पा टेबलापाशी गेले तो टेबलावर वजनाखाली उघडी करून ठेवलेली तार दिसली. "जोशी पास. सेकंड क्लास.—वैद्य." इतका स्थितप्रज्ञ शांत स्वभाव सामान्य नव्हे.

स्वतःच्या मताचा खरेपणा पटविण्यास पुष्कळदा ते दुराग्रहाचा आश्रय करीत. आमचे चुलते कै० नाना उमरावतीस कपाशीची दलाली करीत. सराईसमोरील भोळे यांच्या चाळीत ते रहात असत. ऐन चौकात ती जागा असल्याने तेथे नेहमी मनस्वी धुराळा असे. ज्यूनियर बी. ए. मध्ये असताना दादा व आमचे एक आप्त रा. पुरुषोत्तम बाळकृष्ण काळे सुट्टी घालविण्यास नानांचे घरी राहिले होते. "इतक्या धुळीत तुम्ही राहता कशाला?" असे भाऊसाहेब काळ्यांनी नानांस विचारले. त्यावर दादाच

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणाले, "पैशासाठी वाटेल त्या हालास तोंड द्यावयास हवे." "म्हणजे काय धुळीत लोळावयाचे का? मी देतो तुला चार आणे. धुळीत लोळून दाखव." दादांना आवेश चढला. लागलीच भाऊसाहेबांना साक्षीसाठी बरोबर घेऊन दादा मालटेकडीपुढच्या फुफाट्याजवळ गेले. त्यांनी कपडे काढले. फुफाट्यांत लोळण घेतली, आणखी आपली पावली खरी केली!

एकदा आम्ही रात्रीच्या गाडीने मुंबईस चाललो होतो. दादा बाकावर आडवे झाले होते आणखी मी खिडकीबाहेर तोंड खुपसून होतो. त्या रात्री चंद्रग्रहण होते, मी ते पहात होतो. चंद्र अर्धा ग्रासला गेला होता तेव्हा मी दादांना म्हटले, "दादा, ग्रहण पहायला उठा. आता चंद्र अर्धाच दिसत आहे, पहा." उठण्याचे साफ नाकारून दादांनी उत्तर केले, "त्यात पाहण्यासारखे विशेष ते काय बुवा! प्रत्येक सप्तमीला असेच नाही का दिसत?"

रत्नागिरीस शिक्षक असताना उन्हाळ्याची सुट्टी लागताच दादा मुंबईमार्गे पुण्यास येण्यासाठी बंदरावर गेले. बोटीवर एकही जागा नसल्याने तिकिटे बंद झाली होती. साधारण प्रवासी अशा प्रसंगी घरी परत गेला असता, पण अंगी मुरलेल्या चिवट स्वभावाच्या दादांनी माघार नाकारली आणि त्यांनी काढले गोव्याचे तिकीट. आणखी उलट दिशेने जाणाऱ्या बोटीवर ते चढले व गोवा, बेळगाव या मार्गाने पुण्यास आले. गोवे शहर दिसते कसे असे विचारले असता दादांनी सांगितले, "काळा चष्मा घालून बघितले असता, लिस्बन दिसावे तसे!"

दादांच्या चिवटपणाचा दुसरा मासला प्रि. परांजप्यांना सरकारकडून कौन्सिलमध्ये नियुक्त केले तेव्हा अनुभवास आला. त्या काळात असा मान मोठा गणला जाई. म्हणून तो साजरा करावा व प्रि. परांजपे यांना मानपत्र द्यावे असे वसतिगृहातील विद्यार्थ्यांनी ठरविले. प्रो. के. रा. कानिटकर तेव्हा रेक्टर होते व त्यांनी सहानुभूतिपूर्ण पाठिंबा दिला. वसतिगृहात न राहणाऱ्या विद्यार्थ्यांनी ह्या समारंभात आम्हांलाही भाग घेऊ द्या अशी विनंती कानिटकरांना केली. पण त्यांचा कल होता वसतिगृहवाल्या विद्यार्थ्यांकडे. त्यांना बाहेरचे विद्यार्थी नको होते. म्हणून कानिटकरांनी अट घातली की "किमान वर्गणी शंभर रुपये रोख जमवून आणा, मग पाहू." त्या वेळी विद्यार्थी आताइतके श्रीमंत नसत, पण दादांनी लकडी पुलावर उभे राहून कॉलेजकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांमागे लगड लावून ही रक्कम जमविली व कानिटकरांना नेऊन दिली! ह्यांच्याकडून रक्कम जमविणे होणार नाहीच या समजाने मानपत्र देण्यासाठी केलेल्या करंडकावर "वसतिगृहात राहणाऱ्या विद्यार्थ्यांकडून" असे खोदून घेतले होते ते खोडून योग्य ती दुरुस्ती कानिटकरांना करावी लागली!

महाराष्ट्रीयांच्या उपजत खिळलेल्या अश्लीलतेचा तिटकारा दादांना लहानपणापासून असे. गावातील अश्लील उखाण्यांची गटारगंगा अंगावरून जाऊ नये म्हणून कॉलेजमध्ये असताना होळीच्या व धुळवडीच्या दिवशी कॉलेजच्या वसतिगृहातील भाऊसाहेब काळ्यांकडे दादा दडी मारून राहत असत. विश्वविद्यालयीन शिक्षण घेतलेल्या लोकांच्या क्लबांमधूनसुद्धा पत्ते कुटताना किती ओंगळ गप्पा चालतात त्यावरून आपली अभिजात अश्लील वृत्ती ओळखावी असे ते म्हणत. प्रसिद्ध नाटककार कै. माधव नारायण जोशी यांचे "विनोद" नाटक रंगभूमीवर आले. ते पुण्यास पाहिल्यानंतर त्यातील अश्लील भाषेची किळस येऊन त्या नाटकास सरकारकडून बंदी घालण्याचा त्यांनी निष्फळ प्रयत्न केला होता. याच नाटककाराच्या आणखी एका नाटकास आम्ही गेलो असता, नव्या जोड्याचा मोह दादांस मोडवेना. केवळ म्हणूनच त्या रात्री रंगभूमीची शोभा बचली!

केवळ विनोदी लेखनाखेरीज गंभीर मतप्रदर्शनासाठीही दादांनी पुष्कळ गोष्टी लिहिल्या. फाशीच्या शिक्षेच्या अनिष्टतेबद्दल मासिक 'मनोरंजना'त आणि अस्पृश्यतेच्या शापाबद्दल व वेठीस धरण्याच्या निर्दय चालीविरुद्ध 'उद्यान' मासिकात त्यांनी गोष्टी लिहिल्या. "अस्पृश्य" ह्या गोष्टीच्या हजारो प्रती बॉम्बे बुक अँड ट्रॅक्ट सोसायटीने मुद्दाम काढवून वाटल्या होत्या. ह्याच गोष्टीवर एक मूक चित्रपटही निघाला होता. विनोदाने हास्यनिर्मिती होते. अन्यायाचे वर्णन वाचून त्वेष येतो. पण करुण भावनांचे चित्रण अधिक प्रभावी ठरते. त्यांनी लिहिलेली "काकूंचे देव" ही गोष्ट अंतःकरण पिळवटून टाकते. याचे कारण ती गोष्ट सर्वस्वी खरी आहे म्हणून. त्या गोष्टींत वर्णिलेल्या व्यक्ती खऱ्या होत्या व हकीगतीही खऱ्या होत्या हे उमरावतीस पन्नास वर्षांपूर्वी राहिलेल्यांच्या लक्षात येईल.

दादांच्या सगळ्या लेखनाचे स्थूल अवलोकन केले असता त्यांची जागरूक निरीक्षण वृत्ती जागोजागी प्रत्ययास येते. त्यांच्या साऱ्या लेखनामागे नेहमीच खऱ्या घडलेल्या गोष्टी असतात हे त्यांच्या निकटवासियांस माहीत आहे. निरनिराळ्या ठिकाणी आणि निरनिराळ्या काळी घडलेल्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

घटना निवडून घेऊन ठाकठीकपणे त्यांची सांगड घालावयाची. स्वाभाविक सवयी, लकबी त्या त्या पात्रांच्या स्वाभाविक भाषेत टिपावयाच्या ही दादांच्या लेखनातील जादू आहे. बोलणारे पात्र सोनार असो, प्रभू असो की गुजराती असो, ते आपल्या जन्मजात भाषाविशेषातच बोलावयाचे, ह्या त्यांच्या गोड किमयेचे प्रत्यंतर त्यांनी खाणावळीण-काकूंच्या भोवती गुंफलेल्या कथांमधून दिसून येते. कधी कधी कुत्सितपणाचा आरोप त्यांच्यावर केला जाई. "स्टेट गेस्ट" ह्या लेखाकडे अशा प्रसंगी बोट केले जाई. खरी झोड आहे ती त्या संस्थानी पाहुणचाराच्या चालू होती त्या पद्धतीवर-कोणत्याही एका विशिष्ट संस्थानिकावर नव्हती. तो लेख ज्या विशिष्ट संस्थानाधिपतीवर लिहिला असे पुष्कळजण समजत, त्या अधिपतींबद्दल तर दादांना विशेष आदर होता.

सार्वजनिक व कौटुंबिक आयुष्य जरी दादांना अनेक प्रकारे अनुकूल होते तरी अपत्यवियोगाचे प्रसंग त्यांच्यावर वारंवार येत गेले. ह्यामुळे त्यांचे अंतःकरण अत्यंत हळवे झाले होते. सारासार विचार करून पुनः पुनः दादा दुबळेपणा टाकीत आणि कणखरपणा अंगी आणीत. मनुष्यास अचानकपणे धक्के बसले म्हणजे त्याचा तारतम्यवाद, विवेक थोडासा तरी डळमळतो. भुतांखेतांची आणि तंत्रमंत्रांची एरवी रेवडी उडविणारे दादा पुष्कळदा मुलांचे मायेच्या पोटी गंड्या-दोऱ्यांच्या गुंतावळ्यात अडकत असत. त्यांची अपत्यांबद्दल वदविलेली सारी अनिष्ट भविष्यकथने एकजात खरी ठरली होती.

आतापर्यंत सांगितले ह्याच्या दसपट तरी सांगावयाचे राहिले आहे. ऐकणारा दमेल पण सांगणारा दमणार नाही !

* * *

य. रा. दाते

# कै. डॉ. केतकर — व्यक्ती आणि कार्य

**(केतकरस्मृतिदिनानिमित्त व्यक्त केलेले विचार)**

आज दहा एप्रिल रोजी डॉ. केतकर यांस जाऊन २७ वर्षे झाली. तेव्हा मी जे काही आज त्यांच्याबद्दल बोलणार आहे, ते २७ वर्षांपूर्वीचे जे माझ्या स्मरणात राहिले ते मी सांगणार आहे.

एखाद्या व्यक्तीला प्रत्यक्ष पाहिलेल्या लोकांच्या मनात ज्या कल्पना असतात, त्या त्याला साक्षात पाहिल्यामुळे उत्पन्न झालेल्या असतात. परंतु ज्याने त्या व्यक्तीस पाहिले नसेल तो काही ऐकलेल्या व काही वाचलेल्या वगैरे गोष्टींवरून व त्याच्या स्वतःच्या वैयक्तिक कल्पनांवरून त्या व्यक्तीसंबंधी आपली मते बनवीत असतो. त्यामुळे त्या व्यक्तीला एक प्रकारचे ध्येयवादी रूप प्राप्त होण्याचा संभव असतो. ख्रिस्ताचे जे बारा शिष्य होते, त्यांपैकी सेंट पॉल हा वगळल्यास बाकीचे त्याच्याबरोबर वास्तव्य केलेले व नेहमी गाठीभेटी होऊन विचारांचे आदान-प्रदान होत असलेले असे होते. त्यामुळे त्यांस ख्रिस्त हा आपल्यापैकीच एक आहे असे वाटत असे, व त्याबद्दल त्यांच्यामध्ये एक मित्रत्वाचा भाव असे. परंतु सेंट पॉल याने ख्रिस्ताला कधीच पाहिले नव्हते. त्याचा ख्रिस्ताच्या शिष्यवर्गात मागाहून अंतर्भाव करण्यात आला होता. त्यामुळे त्याच्या मनातील ख्रिस्ताची मूर्ती त्याने आपल्या काही कल्पनांवरून व इतर शिष्यांशी जो त्याचा संपर्क आला त्यावरून परंतु थोडीशी आपल्या ध्येयस्वरूपावरून बनवलेली होती. ख्रिस्ताचे मॅथ्यू वगैरे जे काही शिष्य होते, त्यांनी त्याचे चरित्रही लिहिले आहे. तसे सेंट पॉलने काही केले नव्हते. ख्रिस्ताचे इतर शिष्य जसे यहुदी लोकांतील होते, तसा सेंट पॉल हा जरी यहुदी होता तरी त्याने रोमन नागरिकत्व मिळविले होते व त्याने जो शिष्यवर्ग तयार केला किंवा जो समाज आपल्याभोवती जमविला त्यामध्ये यहुदी लोकांप्रमाणेच इतर लोकसमाजांनाही अंतर्भूत केले. विशेषतः गुलाम वगैरे त्या वेळचा दलित व पीडित वर्ग होता, त्यास त्याने आपल्या अनुयायांमध्ये स्वीकृत केले व त्यामुळे ख्रिस्ताचा संप्रदाय जास्त व्यापक आणि समावेशक बनला. प्रत्यक्ष ख्रिस्तापेक्षाही सेंट पॉलने धर्म-प्रसाराचे काम पुष्कळच केले व आपली मते जास्त उदारमतवादी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

बनविली व त्यामुळे ख्रिस्त-संप्रदायाची वाढ पुष्कळच झाली.

डॉ. केतकर यांच्याबरोबर ज्या मंडळींनी काम केले त्यांस डॉ. केतकर हे आमच्यापैकीच एक आहेत असे वाटत असे; व आम्ही त्यांस जितके जवळून पाहिले होते तितके त्यांस इतरांनी पाहिलेले नव्हते. त्यामुळे प्रत्यक्ष पाहिल्यामुळे जे केतकरांचे स्वरूप आमच्यापुढे होते, तसे इतरांपुढे नसल्यामुळे व नंतरच्या लोकांनी तर त्यांस दुरूनही पाहिले नसल्यामुळे त्यांची त्यांच्याबद्दलची मते काहीशी ध्येयात्मक असणे स्वाभाविक होते.

डॉ. केतकर यांच्या एकंदर आयुष्याचे चार भाग पाडता येतात. पहिला त्यांच्या बालपणाचा व विद्यार्थिदशेचा काळ, नंतर अमेरिकेमध्ये व इंग्लंडमध्ये वास्तव्य केलेला काळ, त्यानंतर ज्ञानकोशलेखनाचा काळ व त्यानंतर अखेरचा त्यांनी इतर लेखन केले तो काळ.

डॉ. केतकर यांचे वडील त्यांच्या अल्पवयातच मृत्यू पावल्यामुळे त्यांची बालपणी थोडी आबाळच झाली. त्यांचे शिक्षण उमरावती येथे व नंतर विल्सन कॉलेजमध्ये झाले. त्यांची कुशाग्रबुद्धी व स्वतंत्र मत बनविण्याची प्रवृत्ती त्यांच्या विद्यार्थिदशेतही दिसून येत होती. त्यांनी मराठी भाषेतील नैपुण्याबद्दल असलेली एक स्कॉलरशिप मिळविली होती. कॉलेजमध्ये असताना नियमित अभ्यासाकडे त्यांचे फारसे लक्ष नसे, परंतु या काळात त्यांनी पुष्कळसे इतर वाचन केले. त्यामुळे इंटरमीजिएट व बी. ए. मध्ये त्यांस अपयश आले. त्या वेळी तरुणांच्या मनात देशभक्तीचे वारे संचारले होते, व त्याचा परिणाम त्यांच्या मनावरही झालेला होता. त्या वेळी इंग्लंडपेक्षाही अमेरिकेमध्ये मतस्वातंत्र्य अधिक असून शिक्षणाचे व्यापक क्षेत्र आहे अशी समजूत रूढ होती. तेव्हा आपण अमेरिकेत जाऊन तेथे शिक्षण घ्यावे; व विशेषतः तेथे मिळणाऱ्या लष्करी शिक्षणाचा फायदा घेऊन आपल्या देशास स्वातंत्र्य मिळवून द्यावे, अशी कल्पना त्या वेळच्या काही तरुणांप्रमाणे डॉ. केतकरांच्या मनातही उत्पन्न झाली होती; व त्याप्रमाणे ते त्यांचे मित्र डॉ. प्रभाकर शिलोत्री यांच्याबरोबर अमेरिकेत जाणार होते; परंतु त्यांची एक बोट चुकल्यामुळे शिलोत्री पुढे गेले व हे नंतरच्या एका बोटीने अमेरिकेस गेले. परंतु त्यांना उमरावतीहून मोठ्या हिकमतीने पळून जावे लागले होते.



अमेरिकेत त्यांनी कॉर्नेल विद्यापीठात बी. ए. ची परीक्षा दिली व नंतर हॉरवर्ड युनिव्हर्सिटीतून एम. ए. होऊन पुन्हा कॉर्नेल विद्यापीठात पीएच. डी. पदवी संपादन केली. या कालातही त्यांनी पुष्कळच वाचन केले. अमेरिकेमध्ये ठराविक अभ्यासक्रमास फारसे महत्त्व नसते व विद्यार्थ्यांस आपल्या आवडीचे निरनिराळे विषय घेऊन पदवी संपादन करता येते व परीक्षेकरता आवश्यक नसलेल्या इतर विषयांचीही व्याख्याने ऐकण्याची सवड असते. त्याप्रमाणे त्यांनी अनेक विषयांची—उदा० भूस्तरशास्त्रासारख्या इतर विषयांशी फारसा संबंध नसलेल्या शास्त्रांचीही—विद्वान अध्यापकांची व्याख्याने ऐकली होती. त्यांनी आपल्या पी.एच. डी. च्या पदवीकरिता समाजशास्त्र हा विषय घेतला होता; व त्याकरिता पुष्कळच वाचन व निरीक्षण केले होते. त्यांना कॉलेजच्या शिक्षणाकरता सयाजीराव महाराजांनी शिष्यवृत्ती दिली होती व ती त्यांच्या प्रोफेसरांच्या शिफारशीवरून एक वर्ष वाढवून देण्यात आली होती. त्यांनी मनुस्मृतीतील वर्णव्यवस्थेसंबंधी प्रबंध लिहिला होता व तो त्यांच्या प्रोफेसरांस मान्य होता. तरी त्यांचे इंग्रजी व फ्रेंच भाषेचे ज्ञान पुरेसे न वाटल्यामुळे त्यांस पदवीकरता एक वर्ष अधिक घालवावे लागले; परंतु त्या कालात त्यांनी विश्वविद्यालयाच्या ग्रंथसंग्रहालयातील अनेक ग्रंथ वाचून काढून आपल्या ज्ञानात पुष्कळच भर घातली. अमेरिकेमध्ये कॉलेजला सुट्टी असताना तेथील विद्यार्थी काहीतरी काम करतात व आपल्या शिक्षणाकरता पैसे मिळवितात. त्याप्रमाणे डॉ. केतकर यांनीही सुट्टीत निरनिराळ्या प्रकारची कामे केली. त्यातच काही काल त्यांनी इंटरनॅशनल एन्सायक्लोपीडिया या ज्ञानकोशाच्या विक्रीचे काम केले व त्यांनी एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिकाशी तुलना करून ब्रिटानिकामध्ये कोणत्या उणिवा आहेत याचीही माहिती करून घेतली. याचा उपयोग त्यांस पुढे ज्ञानकोशाच्या कामामध्ये झाला. अमेरिकेत ज्ञानसंपादनाच्या कामी त्यांनी विशेष लक्ष पुरविले, व सर्वांगीण अभ्यास केला; तो त्यांना अखेरपर्यंत उपयोगी पडला. तसेच अमेरिकन समाजाचे सूक्ष्म अवलोकन केले व तेथील मोकळ्या वातावरणामध्ये व्यक्तीच्या ज्ञानाची व विचारांची कशी प्रगती होते ते पाहिले. याचा त्यांस पुढील कार्यात फार उपयोग झाला.

अमेरिकेहून परत येताना त्यांनी इंग्लंडमध्ये सुमारे दीड वर्ष वास्तव्य केले. त्या कालात त्यांनी हिंदु-धर्माचे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्वरूप व भविष्य यासंबंधी एक ग्रंथ लिहिला व अधिनियम यासारख्या नियतकालिकामध्ये लेख व ग्रंथपरीक्षण करून द्रव्यप्राप्ती केली व तेथेही ब्रिटिश म्युझियम ग्रंथालयाचा उपयोग करून घेतला. तेथे असताना तेथील नो-बडीज्-क्लब या क्लबात बरेच भारतीय व भारताबद्दल आस्था बाळगणारे लोक येत असत, त्यांच्याशी चर्चा व वादविवाद करून भारत व इंग्लंड यांचे संबंध कसे असावेत यासंबंधी काही आपली मते बनविली. याच ठिकाणी त्यांची मिस् कोहन यांच्याशी ओळख झाली व त्या ओळखीचे पुढे विवाहामध्ये पर्यवसान झाले.

इंग्लंडहून परत आल्यावर त्यांनी काही काल हिंदुस्थानात व सिलोन आणि ब्रह्मदेश यांमध्ये प्रवास करण्यात घालविला व तेथील समाजाचे सूक्ष्म अवलोकन करून त्यासंबंधी काही लेख प्रसिद्ध केले. ते मद्रास येथील काँग्रेसला उपस्थित होते व त्या वेळी त्यांची डॉ. के. लक्ष्मीपती यांच्याशी ओळख होऊन त्या वेळी के. व्ही. लक्ष्मणराव हे संपादन करीत असलेल्या आंध्र-विज्ञान सर्वस्वमु या तेलगू ज्ञानकोशाची त्यांना माहिती मिळाली. के. व्ही. लक्ष्मणराव हे महाराष्ट्रीय असून नागपूरच्या भवानीशंकर यांचे आप्त होते. त्यांनी संपादन केलेल्या तेलगू ज्ञानकोशाचे दोन भाग प्रसिद्ध झाले व पुढे ते काम बंद पडले.

डॉ. केतकर हे कलकत्ता विश्वविद्यालयात राजनीतिशास्त्राचे अध्यापक होते. त्या वेळी ते विद्यार्थ्यांस अनेक विषयांची माहिती व्याख्यानात देत असत व आपल्या विद्यार्थ्यांस अभ्यासाच्या कामी पूर्ण स्वातंत्र्य देत असत, व व्याख्याने ऐकण्याबद्दल फारशी सक्ती करीत नसत. पुढे त्यांचे व त्या वेळचे व्हाईस चॅन्सेलर आशुतोष मुकर्जी यांचे काही बाबतीत मतभेद झाल्यामुळे त्यांची प्राध्यापकाची मुदत वाढविण्यात आली नाही. याच सुमारास त्यांनी टागोर लॉ लेक्चररच्या जागेकरिता आवेदन दिले होते, व त्याकरिता हिंदु लॉ नावाचे एक लहानसे पुस्तक प्रसिद्ध केले होते. परंतु ती जागा त्यांस मिळाली नाही.

यानंतर त्यांनी मराठीत ज्ञानकोश तयार करण्याची कल्पना काढून तेच कार्य पुढे करावयाचे असे ठरवून त्याच्या योजनेस आरंभ केला व नागपूर येथे आपल्या काही मित्रमंडळींच्या साह्याने ज्ञानकोश मंडळ या लिमिटेड कंपनीची स्थापना केली. ज्ञानकोशाची जशी अपूर्व कल्पना होती, त्याप्रमाणेच त्याकरिता लि. कंपनी स्थापणे हीही कल्पना अपूर्वच होती. परंतु ती त्यांनी यशस्वी करून दाखविली. मराठी भाषेमध्ये एकंदर ज्ञानसंग्रह तरी केवढा आहे याची मोजदाद करणे आवश्यक होते व याकरिता महाराष्ट्रीय वाङ्मयाचा आढावा घेणे आवश्यक होते. म्हणून महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि तयार करण्याची कल्पना काढून त्यांनी ते काम करण्याचे माझ्यावर सोपविले. या कामात श्री. रामचंद्र त्रिंबक देशमुख हे माझे सहकारी होते. ज्ञानकोशाप्रमाणे या ग्रंथाचीही लोकांस काही कल्पना नव्हती व हे काम ज्ञानकोशास साहाय्यभूत अशा प्रकारचे असल्यामुळे ते शक्य तितक्या लवकर करणे आवश्यक होते. त्याकरिता मी व देशमुख यांनी मुंबई व पुणे येथे वास्तव्य करून पूर्वीचे सरकारी अहवाल छापलेले पुस्तकांचे कॅटलॉग व मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात असलेल्या ग्रंथांचे व तेथील सुमारे ( २०० ) दोनशे निरनिराळ्या मासिकांच्या अंकांचे अवलोकन करून व डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी, पुण्याचे ग्रंथालय वगैरे अनेक ठिकाणची माहिती जमवून या ग्रंथाचे हस्तलिखित अनेक सहायक घेऊन केवळ सतर दिवसांत तयार केले; ते छापावयास एक वर्ष लागले. परंतु अशा ग्रंथाची पूर्वी कोणास कल्पना नव्हती. पण ग्रंथालयीन वाङ्मयामध्ये ते एक अपूर्व असे कार्य झाले. यामध्ये ग्रंथाबरोबरच महत्त्वाच्या मासिकांतील लेखांचेही विषयवार वर्गीकरण असल्यामुळे महाराष्ट्रीय वाङ्मयाचा त्या वेळचा हा संपूर्ण आढावा होता. अशा तऱ्हेचा ग्रंथ तत्कालीन कोणत्याही भाषेमध्ये नव्हता. या ग्रंथाचे महत्त्व त्या वेळी सामान्य लोकांस फारसे वाटले नाही, परंतु डॉ. रंगनाथनसारख्या विद्वानांनी त्याची फार प्रशंसा केली आहे. यातून स्फूर्ती घेऊन पुढे श्री. शं. ग. दाते यांनी ग्रंथसूची तयार केली आहे. ज्ञानकोशाचे काम सुरू झाल्यानंतर हा पहिलाच अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यामुळे एकंदर ज्ञानकोशाच्या कार्यासंबंधी लोकांचे मत अनुकूल बनले. ज्ञानकोशाची सुरुवात नागपूर येथे झाली व वाङ्मयसूची तेथेच छापली गेली. परंतु त्यावरून एकंदर कामाची कल्पना येऊन नागपूरसारख्या ठिकाणी ज्ञानकोशाचे संपादन व मुद्रण होणे कठीण आहे, असे वाटू लागले. वाङ्मयसूची छापण्यास एक वर्ष लागले, व असे ज्ञानकोशाचे २० भाग छापण्यास वीस वर्षे लागली असती व त्यामुळे त्या ग्रंथाचे महत्त्व व उपयुक्तता याबद्दल लोकांत अंदेशा उत्पन्न झाला असता म्हणून यापुढे ज्ञानकोशाचे सर्व कार्य पुणे येथे करावयाचे ठरविण्यात आले. तत्पूर्वी पुण्यास ज्ञानकोश मंडळाची एक शाखा कै. वै. का. राजवाडे यांच्या प्रमुखत्वाखाली सुरू करण्यात आली होती. सन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१९१९ जुलैमध्ये मुख्य कार्यालय पुण्यास आणण्यात आले. तोपर्यंत ज्ञान-कोशातील माहितीचे संकलन करण्याचे काम चालूच होते. ज्ञानकोशाचे कार्य अंगावर घेत असता सर्व विषयांची माहिती देणारा एक ग्रंथ असे याचे जरी स्वरूप असले तरी हा ग्रंथ तयार करण्याची ही सुसंधी आपणास मिळाली आहे, तिचा पूर्ण उपयोग करून महाराष्ट्रामध्ये ज्ञानसंग्रहाबरोबरच एक वैचारिक चळवळीचा आरंभ करून द्यावा अशीही एक कल्पना होती; व पुण्यात आल्यावर या कल्पनेलाच विशेष चालना देण्याचे निश्चित झाले. केवळ संकलनात्मक ज्ञान देणारा एखादा ज्ञानकोशाचा भाग आम्ही या वेळी प्रसिद्ध केला असता तर त्याचा प्रभाव मराठी वाचकांवर पडला नसता. याकरिता ज्याप्रमाणे वाङ्मयसूची तयार करण्यात आली व तिचा प्रभाव लोकांवर पडला, त्याप्रमाणेच काही-तरी विशेष कार्य करून दाखविणे अवश्य आहे असे वाटू लागले. त्याबरोबरच ज्ञानकोश तयार करण्याकरता म्हणून साधनभूत असे जे काही महत्त्वाचे वाङ्मय तयार होत होते त्याचा लोकांस परिचय करून द्यावा म्हणून ज्ञानकोशास प्रस्तावनारूपी असे ग्रंथ तयार करण्याची कल्पना निघाली व जगाच्या सांस्कृतिक इतिहासाचा आढावा घेण्याचे दोन भाग प्रसिद्ध करावे अशी योजना आखण्यात आली व त्यात वेदकालापासून आतापर्यंतच्या एकंदर जागतिक घडामोडींचे वर्णन करणारे ग्रंथ तयार करण्याचे निश्चित करण्यात आले. त्यातील पहिला भाग हिन्दुस्थान आणि जग यांमध्ये हिन्दुस्थानातील संस्कृतीचा बाह्यांवर परिणाम व बाह्य जगाचा हिन्दुस्थानवर झालेला परिणाम दर्शविणारा काही मजकूर तयार करून पुढे वेदकालापासून आज-तागायतचा इतिहास देण्याचे योजिले. परंतु या ग्रंथाचा अर्धा भाग छापून झाला तरी पुढील वेदकालीन संस्कृतीशी त्याचा संबंध जोडणारा जो भाग तयार व्हावयाचा तो प्रत्यक्ष तयार नसल्यामुळे व त्याच वेळी नागपूरमध्ये चालक-वर्गामध्ये काही मतभेद झाल्यामुळे डॉ. केतकरांस व आम्हांस एकत्र बसून कामाची जुळणी करण्यात अडथळा आल्यामुळे ग्रंथाची साखळी नीट जोडता येईना. याकरिता पहिला अर्धा भाग तसाच ठेवून दुसरा भाग वेदापासून आरंभ करण्यात आला व तो भाग पुरा होईपर्यंतच्या काळात पहिल्या भागातील उत्तरार्धाचा मजकूर तयार करण्यात येऊन अनेक विषयांचा अंतर्भाव करून, आज-तागायत म्हणजे त्या वेळच्या काँग्रेस व पंजाबातील चळवळीपर्यंत विवेचन करण्यात आले. हे संकलन करीत असता त्यात इतर अनेक विषयांबरोबरच त्या वेळी नुकत्याच स्थापन झालेल्या सोवियत सरकारच्या घटनेचाही अंतर्भाव करण्यात आला. त्यात सह्याद्रीतील रस्त्यांचीही माहिती विशेष संदर्भाशी जुळत नसली तरी देण्यात आली. अर्थात या ठिकाणी एकंदर कथासूत्रास विस्कळीतपणा आल्याशिवाय राहिला नाही. परंतु त्यावेळी डॉ. केतकरांच्या मनामध्ये जी नागपूरच्या चालकांच्या काही कृतींमुळे व्यग्रता उत्पन्न झाली होती तिचा तो परिणाम होय. या ग्रंथास एकरूपतवाचा साज चढण्याकरिता एक ग्रंथसंगती म्हणून प्रकरण जोडावे लागले.

वर सांगितल्याप्रमाणे ज्ञानकोश तयार करण्याकरता जो एक आम्ही संपादकवर्ग तयार करीत होतो, त्यांच्या ज्ञानाचा व संपादनाचा विकास व्हावा व महाराष्ट्रीयांस अनेक विषयांचे ज्ञान व त्याप्रमाणे प्रेरक असे वैचारिक बल प्राप्त व्हावे, व एक नवीन विचारसंप्रदाय उत्पन्न व्हावा, अशी कार्ययोजना या प्रस्तावनाखंडाच्या पाठीमागे होती. याकरिता पहिल्या भागातील इतिकर्तव्यता म्हणून जो भाग जोडला आहे त्यावरून हे दिसून येईल. यानंतरच्या प्रस्तावना खंडाच्या वेदविद्या, बुद्धपूर्व जग (बुद्धोत्तर) यामध्ये जगाचा सांस्कृतिक इतिहास देऊन पाचव्या विज्ञानेतिहास या भागात भौतिक व सामाजिक शास्त्रांचा इतिहासही देण्यात आला आहे. आम्ही भौतिक शास्त्राइतकेच सामा-जिक शास्त्राचे महत्त्व मानले आहे. त्यामुळे कालगणना, व्याकरणशास्त्र, वगैरेंचाही यात अंतर्भाव केलेला आहे.

ज्ञानकोशाच्या संपादनाबरोबरच त्याची मुद्रणव्यवस्था करण्याचेही काम महत्त्वाचे होते. याकरिता हे काम प्रथम सर्व महाराष्ट्रात प्रसिद्ध असलेला निर्णयसागर छापखाना यांचेकडे सोपविण्यात आले होते, व पहिले दोन भाग तेथेच छापण्यात आले. परंतु संपादकीय काम पुण्यास व मुद्रणाचे काम मुंबईस होत असल्यामुळे ते जितक्या त्वरेने व्हावयास पाहिजे तितके होत नाही व त्याकरता डॉ. केतकर किंवा मी यांपैकी एकास मुंबईस राहावे लागे.

याकरिता पुण्यासच हे काम करण्याचे ठरविण्यात येऊन तिसऱ्या भागाचे मुद्रण आर्यभूषण छापखान्यात सुरू करण्यात आले. याबरोबरच स्वतः टाइप घेऊन स्वतःचे कंपोझिंग खाते सुरू करून दुसऱ्या छापखान्यात मुद्रण करण्याचे काम सुरू केले व याप्रमाणे पाचवा व चौथा भाग छापून झाला. तरी तिसऱ्या भागाची प्रगती फारशी झाली नव्हती म्हणून तोही भाग ज्ञानकोश छापखान्यातच छापून

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पुरा करण्यात आला, व छापण्याचे यंत्रही घेऊन छापखाना पूर्ण करण्यात आला. पुढील सर्व भाग ज्ञानकोश छापखान्यातच छापले गेले. पण यामुळे कार्यकर्त्यांवर विशेष भार पडला पण तो त्यांनी सहन केला. यापुढील मुख्य ज्ञानकोशाचे काम संकलनात्मक असल्यामुळे व आमचा लेखकवर्ग तयार झाल्यामुळे बऱ्याच त्वरेने होऊ शकला.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे मुख्य ज्ञानकोशाच्या संकलनात्मक भागापेक्षा प्रस्तावना खंडामध्ये जो वैचारिक भाग आला आहे त्याचे महत्त्व आम्हांस जास्त वाटत होते. ज्ञानकोश-रचनेची ही संधी आपणांस मिळाली आहे तिचा पूर्ण उपयोग करून विद्वान व विचारवंत कार्यकर्त्यांची एक परंपरा निर्माण करावी हा ज्ञानकोश-रचनेचा मुख्य उद्देश असावा अशी आमची दृष्टी होती व त्याकरिता आम्ही निरनिराळ्या विद्वान व्यक्तींचा संग्रह करण्याचा प्रयत्न केला व नवीन कार्यकर्तेही तयार केले. ज्ञानकोशाच्या कार्यात मिळालेल्या संधीचा फायदा घेऊन अनेक गोष्टींचा अभ्यास करण्याकडे आमच्या कार्यकर्त्यांची प्रवृत्ती होती व त्यांस योग्य ती संधी आम्ही प्राप्त करून देत होतो. कोणताही प्रसंग आला तरी त्यातून काहीतरी नवीन संशोधन किंवा लेखन करण्याची संधी मिळावी असा त्या प्रसंगाचा उपयोग करून घेण्याकडे आमच्या संपादकवर्गाची वृत्ती असे. नागपुरास असताना काही जैन मंडळी आमच्याकडे आली होती व त्यांनी जैनांबद्दल आपण ज्ञानकोशात काय लिहिणार आहात अशी आम्हांस पृच्छा केली; तेव्हा आम्ही जैन वाङ्मयाचा अभ्यास करून पाहिजे तर स्वतंत्र दोन ग्रंथ तयार करू व त्यात जैन सांप्रदायासंबंधी सर्वांना परिपूर्ण अशी माहिती देण्याचे कार्य करू असे सुचविले व त्याकरिता जे संशोधन करावे लागेल त्यास त्यांनी मदत करावी अशी त्यांना विनंती केली. ती जर मान्य झाली असती तर प्रस्तावना खंडाप्रमाणेच जैन सांप्रदायासंबंधी अभ्यासपूर्ण असे खंड तयार झाले असते, परंतु तसा योगायोग आला नाही. अशाच तऱ्हेने जातीसंबंधीचे लेख, महमदासंबंधी उल्लेख, निर-निराळे धंदे यासंबंधी चर्चा वगैरेचा उपयोग करून घेण्यात आला.

ज्ञानकोशामध्ये ज्या मंडळींनी कार्य केले त्यांचीही वृत्ती अशाच प्रकारची होती. ज्ञानकोशाच्या निमित्ताने आपणास अनेक विषयांचा अभ्यास करण्याची सुसंधी मिळत आहे हाच आपणांस मोठा लाभ आहे अशी वृत्ती संपादकवर्गामध्ये असल्यामुळे त्यांनी इतर गोष्टींकडे व आर्थिक लाभाकडेही दुर्लक्ष केले. ज्ञानकोशापासून जर कोणता विशेष लाभ झाला असेल तर अनेक विषयांचा अभ्यास करण्याची संधी मिळणे हाच होय.

ज्ञानकोशाकरिता जो संपादकवर्ग एकत्र आला त्यांनी स्वतःही निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करून दाखविले, यावरून वरील गोष्टीचा प्रत्यय येतो.

ज्ञानकोशाचे कार्य झाल्यानंतर पुढे कोणते कार्य करा-वयाचे यासंबंधी मधूनमधून विचार व चर्चा होत असे व त्याप्रमाणे काही योजनाही आम्ही पुढे मांडल्या होत्या. आमचे डॉ. केतकर यांस हेच सांगणे होते की, पुढे दहा वर्षे पुरेल असे एखादे नवीन काम अंगावर घ्यावे. त्याकरिता आम्ही महाराष्ट्र शब्दकोश, विद्यासेवक मासिक चालविणे वगैरे योजना सुचविली. परंतु त्यातून निश्चित अशी काही योजना बाहेर पडली नाही. त्यामुळे हा जो ज्ञानकोशाच्या कार्यामुळे एकत्र आलेला संच होता तो विस्कळित झाला. त्यातूनही दाते, कर्वे यांनी महाराष्ट्र शब्द-कोशाचे व इतर कोशांचे संपादन केले. श्री. चित्रावशास्त्री यांनी चरित्रकोशाचे कार्य केले. श्री. वापट व दातार यांचा पुढे वैदिक संशोधनमंडळाने श्रौतकोश रचनेच्या कामी उपयोग करून घेतला; अशी निरनिराळ्या प्रकारची कार्ये झाली. परंतु मुख्य ज्ञानकोशाचा संच एकत्र राहू शकला नाही व त्यानंतर नवीन माणसे तयार करता आली नाहीत.

डॉ. केतकर यांस काही लोक विक्षिप्त म्हणत, परंतु रुळलेल्या चाकोरीतून न जाता स्वतंत्र मार्गाने जाणारा मनुष्य हा थोडा सामान्य व्यक्तीपेक्षा निराळाच असतो, व म्हणूनच तो काही अलौकिक असे कार्य करू शकतो. ते आपल्या समाजावर टीका करीत असता फार कडक भाषा वापरीत. यासंबंधी विचारले असता ते म्हणत की, आपल्या समाजाला जागे करण्याकरता कठोर भाषाच वापरली पाहिजे, त्याशिवाय त्याचा परिणाम होणार नाही.

पुढे पुढे त्यांच्या विचारामध्ये व लेखनामध्ये थोडा विचित्रपणा उत्पन्न झाला होता. तो कदाचित वयोमानामुळे किंवा एकंदर कौटुंबिक परिस्थितीमुळे उत्पन्न झाला असावा; परंतु त्यांचे मुख्य कार्य समाजाला विचारप्रवण करावे हे होते. ज्ञानकोशामध्ये किंवा त्यांनी लिहिलेल्या निबंधवजा कादंबऱ्यांमध्ये हीच गोष्ट दिसून येते. तेव्हा डॉ. केतकर यांनी केलेले मुख्य कार्य त्यांनी जे निरनिराळे विचारप्रवाह आपल्या लेखनामध्ये सोडून दिले व अभ्यासप्रवृत्तीला चालना दिली हेच होय व त्यांच्याबरोबर जी आम्ही सुमारे बारा वर्षे काढली त्यांत आम्हांला अनेक विषयांचा अभ्यास करण्याची संधी मिळाली व अनेक प्रकारचे कोश करण्याचे कार्य जे आमच्या हातून घडले त्यातच आम्ही केलेल्या श्रमाचे साफल्य झाले असे आम्हांस वाटते.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

डॉ. ना. ग. जोशी

# इतिहासंशोधक वाकसकरांचे काही निष्कर्ष

बडोयाचे इतिहासकोविद श्री. वि. स. वाकसकर सर्व मराठी भाषिक लोकांच्या परिचयाचे आहेत. कै. गो. स. सरदेसाई यांच्यापासून इतिहासाभ्यासाची स्फूर्ती घेऊन त्यांनी इतिहासविषयक लेखन सुरू केले, ते आजतागायत, वयाची ८० वर्षे उलटली तरी चालू आहे. त्यांनी अलीकडे-अलीकडे (१९५७) "सभासदाची बखर" संपादिली व तिच्या तीन आवृत्त्या निघाल्या. त्यापूर्वीच सन १९३० साली त्यांनी "९१ कलमी बखरी" चे संपादन केले होते. त्याची वाखाणणी कै. जदुनाथ सरकार यांनी केली होती. तिचीही सुधारलेली दुसरी आवृत्ती अलीकडे प्रसिद्ध झाली आहे. आणखीही दुसरी मोठी शिवचरित्रविषयक बखर त्यांनी सटीक संपादून तयार केली असून ती प्रकाशनाच्या मार्गावर आहे. या सर्व संपादनकार्यातील श्री. वाकसकर यांची चिकाटी व श्रम करण्याची वृत्ती पाहून आश्चर्य वाटते. वारीकसारीक तपशिलाच्या बाबीही त्यांनी साक्षेपाने व साधार स्पष्ट केल्या आहेत.

× × ×

पण या संपादनात त्यांची काही मते पुन्हा पुन्हा आग्रहाने मांडलेली आहेत. त्यांतील दोन मतांबद्दल पूर्वीच अभूतपूर्व चर्चा झालेली आहे. पण पुन्हा त्यांनी या बखरीच्या नव्या आवृत्त्यांत त्यांचा नव्या आग्रहाने पुनरुच्चार केलेला आहे. ती मते म्हणजे :

(१) भोसले हे सिसोदिया घराण्यातले व रजपूत कुळातील होते असे म्हणता येत नाही;

(२) शिवाजीमहाराजांची जन्मतिथी वैशाख शु॥ २ च आहे असे (आणखी नव्या) पुराव्याने सिद्ध होते.

या दोन्ही मुद्द्यांबाबत वरील ग्रंथात त्यांनी पुन्हा हिरीरीने चर्चा केली असताही महाराष्ट्रातील विद्वानांनी व नियतकालिकांनी त्यांची दखल घेतली नाही (एकंदरीतच श्री. वाकसकर यांच्या संपादनकार्याची दखल विशेष आस्थेने घेतली गेली नाही) असे विचारान्ती वाटू लागते, व म्हणूनच केवळ हौशी इतिहासवाचक असूनही मी त्या मुद्द्यांबाबतच्या काही शंका "म. सा. पत्रिके" च्याद्वारे इतिहासाभ्यासकांपुढे ठेवण्याचे धाडस करीत आहे. याबद्दल अधिक चर्चा झाल्यास श्री. वाकसकर यांना आनंदच होईल व उपेक्षा केल्याचे मनःशल्य निघून जाईल.

(१) "श्रीशिवप्रभूचे चरित्र" ('सभासद बखर') याच्या पृ. १२५ वर अशी टीप आहे : 'छत्रपतींचे भोसले हे कुळ उदेपूरकर शिसोदे या राजपूत कुलातून उत्पन्न झाले असे (राज्याभिषेकाच्या वेळी) प्रसिद्ध करण्यात आले. परंतु मराठे हे मूळचेच आर्य क्षत्रिय आहेत."

सन १९६२ च्या तिसऱ्या आवृत्तीतही 'मराठे हे मूळचेच आर्य क्षत्रिय' (राजपूत क्षत्रियांहून वेगळे) आहेत असे 'च'कारपूर्वक लिहिले जाते याचे आश्चर्य वाटते. मराठे मूळचे कोण किंवा महाराष्ट्रातील सर्वच लोक मूळचे कोण, याबद्दलचे जुने, डळमळीत अनुमानावर आधारलेले निर्णय बदलावयास पाहिजेत, इतके संशोधन व लेखन आता महाराष्ट्रात झालेले आहे. 'आर्य-आर्य' करीत बसणे हे आताच्या इतिहासकारांनी सोडले आहे. पुरातत्त्व संशोधन, मानववंशशास्त्र, अनुवंशशास्त्र यांच्यांतील प्रगत विचारांधारे भारतातील कोण लोक 'मूळचेच आर्य' हे तपासले जात आहे व दक्षिणेकडच्या प्रजांतील आर्येतर मिश्रण स्पष्ट होत आहे. श्री. वाकसकरांचे यासंबंधीचे विचार भांडारकर-राजवाडे वगैरेंच्या अनुमानांभोवतीच अजून घुटमळत आहे. तसे दिसते.

"सभासद-बखरी"तून (पृ. ३३) "९१ कलमी बखरीत" उद्धृत केलेला पुढील उतारा विरामचिन्हांशिवाय आहे व ते त्या काळाच्या लेखनपद्धतीला धरूनच आहे :

> 'राजियाच्या (शिवाजीच्या) मतें सला करावी तरी कोणी मातबर रजपूत नाही जे आपणही रजपूत आणि तेही रजपूत हिंदुधर्म रक्षून आपले संरक्षण करील शास्ताखान म्हणजे मुसलमान...' (पृ. ८७ व ९२)

यातील 'तेही रजपूत' याचा अर्थ श्री. वाकसकर 'शास्ताखान याचा पक्ष' किंवा 'मोगली' पक्ष असा करतात! आणि असा काल्पनिक आणि धक्का देणारा अर्थ ते कोणत्या आधारावर करतात, तर 'रजपूत' म्हणजे शब्दशः 'राजपुत्र' म्हणजेच 'योद्धा' (या संदर्भात मोगल राजांचे संबंधी!) या अर्थावर विसंबून! वरील



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचायते तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

उतार्‍यात व्याकरणदृष्ट्या शब्द वाढवून योग्य तेथे तो शब्द वाढवून वाचल्यास त्याचा अर्थ अगदी सरळ व सर्वमान्य असा होऊ शकतो :

' जे आपणही रजपूत आणि तेही रजपूत (म्हणून) हिंदुधर्म रक्षून......' असे वाचन केल्यावर 'आपण' म्हणजे स्वतः शहाजी वगैरे भोसले लोक आणि तेही' म्हणजे 'मातबर रजपूत' म्हणजेच इतर कोणी समर्थ रजपूत, असा स्वाभाविक अर्थ निष्पन्न होतो. वाटेल तो 'योद्धा' असा नव्हे !

श्री. वाकसकर यांनी कै. इतिहासाचार्य राजवाडे यांना, काल्पनिक खुलाशाबद्दल, 'इतिहासचूडामणि' असे संबोधून चिमटा घेतलेला याच बखरीतील विवेचनात नमूद आहे. स्वतः श्री. वाकसकरांनी या ठिकाणीं 'इतिहासचूडामणी'-च्याच माळेतले मणी ठरावेत असा कल्पनाविहार त्यांनी केला आहे 'रजपूत' याचा अर्थ 'योद्धा' असा पर्यायाने होईल. पण हिंदुधर्म 'रक्षून नव्हे तर भक्षून' विजयी झालेल्या शास्ताखानासारख्या परधर्मीयाला उद्देशून या उतार्‍यात 'रजपूत' शब्द वापरला असेल असे शाबीत करावयाचे असल्यास त्यासाठी तशा अर्थाचे काही पूर्वगामी दाखले दाखविले पाहिजेत. श्री. वाकसकरांनी तसे काहीच केलेले नाही. तसे दाखविणे शक्यही नाही. भोसले कूळ शिसोदिया आहे अशी त्या काळची मान्यता असली पाहिजे व त्याला अनुसरूनच गागाभट्टांनी आपला निर्णय दिलेला असणार. त्यात काही 'राजकारण' असावे असे श्री. वाकसकर ध्वनित करतात. पण काशीहून येणार्‍या गागाभट्टाला त्या राजकारणात ओढण्याएवढा प्रबळ पुरावा त्यांनी दिलेला नाही. ते केवळ तत्कालीन राजनीतिविषयक वर्तनक्रमावरून काढलेले निराधार अनुमान आहे.

(२) "९१ कलमी बखरी"च्या आपल्या आवृत्तीत (पृ. ६६) श्री. वाकसकर कै. शां. वि. आवळसकर यांच्या "प्रतापगडची भवानी" (म. म. पोतदार-षष्ट्यब्दिसन्मान-ग्रंथ') या लेखातील एका उल्लेखाचा संदर्भ देऊन प्रतापगडावर 'शिवाजीमहाराज यांच्या समक्ष' शिवजयंत्युत्सव वगैरे उत्सव होत व शिवजयन्त्युत्सव 'वैशाख शु॥ २ स' होई असे लिहितात. मूळ लेखातील अवतरण असे : "थोरल्या छत्रपतींच्या कालापासून येथे धर्मकृत्यें रूढ झाली. वैशाख शु. २ स शिवजयंत्युत्सव प्रतिवर्षी होतो" (सदहू लेख, कलम ७ वे.) लेखात १९ व्या शतकातील रूढ चाली त्या काळी होत्या एवढेच लिहिलेले आहे. व त्याला आधार म्हणजे देवीच्या मूळ पुजार्‍यांच्या आजच्या वंशजांचे सांगणे एवढाच दिला आहे. प्रतापगडाची स्थिती मधल्या काळात फार हलाखीची होती. पण टिळकांच्या वेळच्या राष्ट्रीय चळवळीने प्रतापगडाकडे महाराष्ट्रीयांचे लक्ष पुन्हा वेधले. त्यापूर्वीच्या काळातही वै. २ लाच शिवजयंत्युत्सव चालू होता हे मानावयास प्रमाणवादी मन कचरते. कदाचित रायगडाप्रमाणेच प्रतापगडावरही झालेल्या पुनरुज्जीवन-कार्याचा हा परिणाम असावा. सांगोपांगी परंपरांना ऐतिहासिक प्रमाणाचा दर्जा आपोआप देणे सयुक्तिक नव्हे. श्री. वाकसकर यांनी 'तोतया शिवजयन्ती' या नावाचे परिशिष्ट "सभासद बखरी"च्या आवृत्तीला जोडून शिळ्या कढीला ताजा ऊत आणण्याचा यत्न केला आहेच, व त्याच्या अनुरोधानेच त्यांनी कै. आवळसकरांच्या लेखाचा उल्लेख केलेला आहे. दुर्दैवाने श्री. आवळसकरही आता हयात नाहीत.

× × ×

एवढी ही विवाद्य स्थळे वगळली तर या बखरीचे संपादन चांगले झालेले आहे असेच म्हणावे लागते. या "९१ कलमी बखरी" ला जोडून संपादकांनी भोसले कुलातील पुरुषांची चरितावली दिली आहे ती अभ्यासपूर्ण व अतिशय उपयुक्त आहे. विशेषतः शहाजी राजांच्या कार्याचे विवेचन उद्बोधक आहे. जुन्या ग्रंथांचे संकलन-संपादन हे संशोधनाएवढेच महत्त्वाचे असते हे लक्षात घेऊन श्री. वाकसकरांच्या वृद्धावस्थेत चाललेल्या या चांगल्या कार्याचे स्मरण इतिहासप्रेमी व शिवरायप्रेमी मराठी जनता दीर्घकाळ करील याबद्दल संदेह नाही.

* * *




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सौ. सुहासिनी लद्दू

# " शास्त्रीय मराठी व्याकरणा "तील काही शंकास्थळे

## प्रास्ताविक

कोणत्याही प्रकारच्या समूहातील घटकांच्या वर्गीकरणाबद्दल काही निश्चित अपेक्षा असतात. घटकांचे वर्गीकरण करताना निकष, प्रमाण अथवा व्यवच्छेदक तत्त्व एकच ठेवून त्याने सर्व घटकांचे मूल्यमापन केलेले असले पाहिजे. अर्थातच प्रत्येक वर्गाच्या घटकांची बेरीज मूळ समूहाच्या घटकांच्या संख्येइतकी असली पाहिजे. तसेच एकेका घटकानेच बनलेले वर्ग एकापेक्षा अधिक असू नयेत. म्हणजेच एकापेक्षा अधिक वर्गामध्ये एकेकच घटक असू नये. प्रत्येक वर्गात एकापेक्षा अधिक घटक असून, फक्त एकाच वर्गात एक घटक असेल तो वर्गीकरण झाल्यावर शिल्लक उरणारा, उरलेल्या कोणत्याही वर्गात न बसणारा असेल. इतर कोणत्याही वर्गात बसू न शकल्यामुळे शिल्लक राहिलेले घटक संकीर्ण या एका वर्गात जाऊ शकतात. असे वर्गीकरण झाले नाही तर वर्गीकरण करण्याचा एक मूळ हेतूच—घटकातील परस्पर साम्य-विरोधामुळे विवेचकास विवेचन स्पष्ट करण्यास व अभ्यासकास ते लक्षात ठेवण्यास सुलभ जावे हा—नाहीसा होतो. याच कारणाने एका तत्त्वाने वर्गीकरण केल्यावर एकच घटक दोन वर्गांत असणे योग्य ठरत नाही. कारण असे झाल्यास, वर्गीय घटकांची संख्या समूहाच्या घटकांच्या संख्येइतकी होणे आवश्यक आहे असे जे वर म्हटले आहे ते शक्य होणार नाही.

कै. मो. के दामले यांच्या शास्त्रीय मराठी व्याकरणात सर्वनामे, विशेषणे व क्रियाविशेषणे यांच्या बाबतीत वर्गीकरणाच्या वरील अपेक्षा पूर्ण होत नाहीतसे दिसते. क्वचित ठिकाणी दामले यांनी आपले वर्गीकरण सदोष आहे याची जाणीव व्यक्त केली आहे. विशेषणांचे सार्वनामिक, गुण व संख्या विशेषणे असे तीन भेद ( म्हणजेच वर्ग ) पाडताना ते म्हणतात—" विशेषणांचे हे वर्गीकरण कितपत सशास्त्र आहे हे ठरविणे न्यायशास्त्राचे काम आहे. त्या शास्त्राच्या कसोटीस हे उतरेलसे वाटत नाही. कारण की, सर्वच विशेषणे गुणवाचक म्हणजे धर्म दाखवणारी आहेत हे उघड आहे. तथापि हे वर्गीकरण न्यायशास्त्राच्या दृष्टीने जरी ह्याप्रमाणे त्याज्यच ठरले तरी ते व्याकरणात उपयोगी आहे...... तात्त्विक दृष्टया संख्या हा एक धर्म म्हणजे गुण होय हे जरी खरे आहे, तरी व्यवहारामध्ये गुण आणि संख्या ह्यामध्ये नेहमी विरोध दाखवतात.[१] "

## १. विशेषणांचे वर्गीकरण

विशेषणांच्या बाबतीत असे दिसून येते की विशेषणांचे सार्वनामिक, गुण व संख्या–विशेषणे असे तीन वर्गांत केलेले वर्गीकरण एकाच व्यवच्छेदक तत्त्वाने अथवा प्रमाणाने केलेले नाही. दामले यांना हे वर्गीकरण शास्त्रीयदृष्टया सदोष वाटले ते ' गुण ' या मूळच्या अतिव्याप्त शब्दाच्या अव्याप्त वापरामुळे. त्यांच्या दृष्टीने शास्त्रीय सदोषता येथे केवळ गुण या शब्दाच्या उपयोगावरच आधारलेली आहे. परंतु विशेषणांचे वरील तिन्ही भेद पाहिले असता त्यांच्या वर्गीकरणाचे प्रमाण काय आहे हेच मुळात समजत नाही. कारण सार्वनामिक विशेषणे हा प्रकार त्यांनी " अर्था "वर आधारून न करता " स्वरूपा "वरून केलेला दिसतो; याउलट, गुणविशेषणे व संख्याविशेषणे हे दोन भेद " अर्था " वर आधारून केलेले दिसतात. दामले म्हणतात, " सार्वनामिक विशेषणे ही मूळची सर्वनामे किंवा तद्भव म्हणजे सर्वनामांपासून साधलेली आहेत, म्हणून इतर विशेषणांपासून त्यांचा भिन्न वर्ग करणे उचित होय.[२] " यावरून हा भेद " स्वरूपा "वरूनच केलेला असावा हे स्पष्ट दिसते. विशेषणाच्या या वर्गीकरणाला " अर्थ व स्वरूप " असे जोड प्रमाणही योजलेले दिसत नाही. कारण संख्याविशेषणे ( उदा. एक व पाचवा )

---

१. पृ. १३३ ( आ. १ )

२. पृ. १३३

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

व गुणविशेषणे (उदा. वाईट व सुती) यांच्या स्वरूपात भेद दिसत नाही. दोन्हीही सिद्ध (एक, वाईट) व साधित (पाचवा, सुती) होऊ शकतात. सार्वनामिक साधित विशेषणांना जो अर्थ व्याप्त झाला आहे तो त्यांच्या मूळ प्रकृतीनेच प्रतिबिंबित केला आहे. याकरिता त्यांचे वर्गीकरण 'सर्वनामापासून ती तयार होतात' एवढ्याच कारणाने करण्याची आवश्यकता नाही. तेव्हा सोईच्या व शास्त्रीय वर्गीकरणाच्या दृष्टीने विशेषणांचे प्रथम दोन भेद अर्थानुसार (१) गुणवाचक[3] व (२) संख्यावाचक असे करून त्या प्रत्येकाचे स्वरूपानुसार सिद्ध व साधित असे दोन दोन उपप्रकार करता येतील. जसे :—




वरील प्रकारे विशेषणांचे वर्गीकरण केल्यावर, साधित गुणवाचक विशेषणांत इतर नामसाधित (उदा. सुती) अथवा क्रियाविशेषणसाधित (उदा. इथला) याप्रमाणे सर्वनामसाधित विशेषणाचाही आपोआपच अंतर्भाव होईल. अशा प्रकारचे वर्गीकरण शक्य असता दामले यांनी सार्वनामिक°, गुण° व संख्या° विशेषणे अशी विभागणी का केली असावी ?

## २. क्रियाविशेषणांचे वर्गीकरण

क्रियाविशेषणांचे "स्वरूपा" वरून तीन प्रकार पाडले आहेत : (१) सिद्ध, (२) साधित व (३) स्थानिक. हे प्रकार वाचताना स्वरूपाच्या निकषाने "सिद्ध" व "साधित" हे दोन वर्ग योग्य वाटतात; पण स्थानिक हा वर्ग कशाकरता केला असावा ? कारण जशी "स्थानिक क्रियाविशेषणे" आहेत, तशीच "स्थानिक नामे" ही असू शकतात. "आंधळ्याला भाकरी वाढा" यातील "आंधळा" हे विशेषण स्थानिक नाम आहे, तर "काल त्याची फार वाहवा झाली" यातील "वाहवा" हे केवलप्रयोगी अव्ययही स्थानिक नाम आहे. नामांचे वर्गीकरण करताना दामले यांनी त्यांचा "स्थानिक" नामे असा एक वर्ग केलेला नाही. असे असताना क्रियाविशेषणांच्या बाबतीतच त्यांनी हा वर्ग का मानला ? तसेच "स्वरूप" या शब्दाने शब्दाच्या "मूळ-रूपा"कडे लक्ष वेधले जाते. शब्दाचे स्वरूप वर्णाशिवाय व्यक्त होत नाही व वर्णांनी युक्त असा लहानात लहान अर्थपूर्ण असा भाषेच्या प्रवाहाचा एक तुकडा म्हणजेच "मूळ-रूप" अशी कल्पना नजरेसमोर येते. ज्याअर्थी स्वरूपावरून दामले यांनी सिद्ध व साधित असे शब्दांचे प्रकार केले आहेत त्याअर्थी 'सिद्ध' म्हणजे एकाच "मूळ-रूपा"ने युक्त शब्द व "साधित" म्हणजे एकापेक्षा अधिक मूळरूपांनी युक्त शब्द असाच अर्थ त्यांनाही अभिप्रेत असावा. "स्वरूप" या शब्दाच्या त्यांना मान्य असलेल्या या अर्थानेही हे वर्गीकरण योग्य ठरत नाही. कारण स्वरूपावरून होणाऱ्या या वर्गीकरणातील "स्थानिक" या शब्दाचा अर्थ "सिद्ध" व "साधित" या शब्दांप्रमाणे स्वरूपाकडे लक्ष वेधत नाही; तर तो त्या शब्दाच्या वाक्यातील विशिष्ट उपयोगाकडे लक्ष वेधतो.

## ३. सर्वनामांचे वर्गीकरण

सर्वनामांच्या वर्गीकरणातही असाच काही घोटाळा झाला असल्यासारखे दिसते. सर्वनामाचे "पुरुष" लक्षात घेऊन चार वर्गांत वर्गीकरण केले आहे : (१) प्रथम पुरुषवाचक—मी, आपण; (२) द्वितीय पुरुषवाचक—तू, आपण; (३) तृतीय पुरुषवाचक—तो, हा, जो, कोण, काय; व (४) सर्व पुरुषवाचक—स्वतः, आपण. या वर्गीकरणात "आपण" हे सर्वनाम वर्ग एक, दोन, व चार यांमध्ये आले आहे. या तिन्ही वर्गांतील "आपण" भिन्न भिन्न अर्थी आहे असे मानले, तर सर्वनामसंख्या **अकरा** व्हावयास पाहिजे; कारण वर्गीय घटकांची बेरीज मूळ समूहाच्या घटकांच्या संख्येइतकी असते. ज्याअर्थी दामले यांनी ही संख्या **नऊ** दिली आहे त्याअर्थी या भिन्न वर्गांतील "आपण" हे सर्वनाम एकाच अर्थाने त्यांना अभिप्रेत असावे असे दिसते; त्यामुळे वर्गीकरणाच्या किमान एका अपेक्षेच्या दृष्टीने असमाधान प्राप्त होते.

सर्वनामांचे वर्गीकरण एकदा "पुरुष" लक्षात घेऊन केल्यानंतर पुन्हा आणखी एका प्रकाराने केलेले आहे. हे दुसरे वर्गीकरण बहुधा अर्थावरून केलेले असावे.

३. 'गुणवाचक' या शब्दातील 'गुण' शब्द न्यायशास्त्राच्या 'गुण' या अर्थाने न वापरता दामले यांनी अभिप्रेत व्यावहारिक अशा मर्यादित अर्थाने वापरला आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सर्वनामाचे या प्रकाराने ज्या सहा वर्गांत विभजन केले आहे ते अनुक्रमे ( १ ) पुरुषवाचक ( २ ) आत्मवाचक ( ३ ) दर्शक ( ४ ) संबंधी ( ५ ) प्रश्नार्थक व ( ६ ) अनिश्चित, असे आहेत. यांतील पहिल्या वर्गातील " पुरुष " शब्द गोंधळात टाकणारा वाटतो. सर्व सर्वनामे कोणता ना कोणता पुरुष ( पहिल्या प्रकारच्या वर्गीकरणाप्रमाणे ) दाखवतात; तर सर्वनामांचा एक वर्ग " पुरुष " दाखवतो व दुसरा दाखवत नाही, हे विधान विसंगत किंवा पूर्वापार विरुद्ध वाटते. या दुसऱ्या वर्गीकरणामध्ये ' पुरुष ' शब्दापेक्षा दुसरा एखादा शब्द योजला असता तर पहिल्या वर्गीकरणातील " पुरुष " व दुसऱ्या वर्गीकरणातील "पुरुष" यातील अर्थभेद स्पष्ट होऊन गोंधळ झाला नसता. "नामत्ववाचक " " व्यक्तिवाचक " अथवा " वस्तुवाचक " ( दामले यांच्याच " वस्तू "[४] या शब्दाच्या अर्थाने ) असा एखादा शब्द पहिल्या वर्गाला उपयोगी पडला असता किंवा नामाचे अनेकवचन देताना पृ. २९८ ते ३०५ मध्ये स्त्रीलिंगी नामाचे, अनेकवचनाच्या प्रत्ययानुसार ' आतेचा गण, भिंतीचा गण, झेपेचा गण ' अशी त्या प्रत्येक गणातील एकेक खुणेच्या शब्दावरून ज्याप्रमाणे त्यांनी गणांची नावे दिली आहेत, त्याचप्रमाणे सर्वनामांच्या वर्गांची नावे दिली असती तरीही गोंधळ झाला नसता.

वर दाखविल्याप्रमाणे " पुरुष " या एकाच शब्दाचे दोन वेगळ्या ठिकाणी प्रयोग केल्यामुळे सर्वनामांच्या वर्गीकरणात जसा एक दोष निर्माण झाला आहे तसाच, " कोण " व " काय " ही दोन सर्वनामे " अनिश्चित " व " प्रश्नार्थक " या दोन वर्गांत येऊन पहिल्या वर्गीकरणातील " आपण " हे तीन वर्गांत दिल्यामुळे जो दोष उत्पन्न झाला आहे तोच पुन्हा निर्माण झाला आहे.

सर्वनामांची संख्या सात असावी. आठ, नऊ की असंख्य हा वैयाकरणांत प्रचंड चर्चेचा झालेला विषय बाजूला ठेवला, तरी मनात वरचेवर प्रश्न असा येतो की, फक्त नऊ सर्वनामांचे सहा भागांत वर्गीकरण करून विवेचनाच्या दृष्टीने कोणती सुलभता साधली गेली ? " मी " ची रूपे ज्या नियमांनी होतात त्याच नियमांनी "तू" ची साधत नाहीत व " आपण " चीही साधत नाहीत, तेव्हा त्यांचा एक वर्ग करून विशेष कोणता फायदा झाला ? तसेच पान १०८ वर दामले लिहितात " आता मी, तू आणि आपण, ह्या प्रधान पुरुषवाचकांशिवाय इतर सर्वनामांच्या वर्गीकरणाकडे वळू. पूर्वी ( अ. ११८ ) सांगितल्याप्रमाणे इतर सर्वनामांचे पुढे दिलेले पाच वर्ग आहेत. : ( १ ) आत्मवाचक—आपण, स्वतः ( २ ) दर्शक—तो, हा. ( ३ ) संबंधी–जो. ( ४ ) प्रश्नार्थक—कोण, काय. ( ५ ) अनिश्चित,—कोण काय," यावरून असे दिसते की पुरुषवाचक[६] सर्वनामांत–त्यांना येथे प्रधान पुरुषवाचक सर्वनाम असे म्हटले आहे–फक्त मी, तू व आपण यांचाच समावेश होतो. म्हणजेच " पुरुषा " वरून केलेल्या वर्गीकरणातील प्रथम पुरुषवाचक व द्वितीय पुरुषवाचक यांचे एकत्रीकरण करून त्यांना " प्रधान पुरुषवाचक " म्हटले आहे. यामुळे वर्गीकरणात एकप्रकारची शिथिलता दिसते व ते पुढील प्रकारे दामले यांना अभिप्रेत असावेसे वाटते—




" प्रतिबिंबी " म्हणजे ज्यांना स्वतःचा पुरुष नाही, परंतु वरील कोणत्याही पुरुषवाचकाचा अर्थ बिंबप्रतिबिंब भावाने सांगतात अशी म्हणजेच सर्व पुरुषवाचक[५] सर्वनामे.

सर्वनामांचे सहा भेद दाखवताना दामले यांनी कोणते व्यवच्छेदक तत्त्व वापरले असावे ते स्पष्ट होत नाही. पुरुषवाचक व आत्मवाचक सर्वनामांत ' अर्थ ' लक्षात घेतला गेला असेल तर दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक व अनिश्चित असे सर्वनामांचे वर्ग पाडताना ' उपयोग ' लक्षात घेतला गेला असे दिसते. ' अर्थ व उपयोग ' दोन्ही एकाच वेळी लक्षात घेतली गेली असावीत असे वाटत नाही, कारण अनिश्चित

४. पृ. ८४ " ... या लक्षणातील ' वस्तू ' शब्दाचा उपयोग अत्यन्त विस्तृत अर्थाने केला आहे. त्याने ' प्राणी, पदार्थ व त्यांचे ठायीचे धर्म ' या सर्वांचा बोध विवक्षित आहे. "

५. वर्गीकरणाच्या दुसऱ्या प्रकारान्वये. पृ. ९८.

६ पृ. ९९.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचायला तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

व पुरुषवाचक सर्वनामे बहुशः एकाच प्रकारे उपयोजिली जातात. तसेच दर्शक सर्वनाम 'तो' हे एकदा पुरुषवाचकाप्रमाणे व एकदा दर्शक सर्वनामाप्रमाणे वापरले जाते. तेव्हा या दोन्हीशिवाय सर्वनामाला काही वेगळे व्यवच्छेदक तत्त्व वापरले असले पाहिजे. परंतु त्यांनी ते स्पष्ट केलेले नाही व त्याचमुळे हे वर्गीकरण कोणत्याच निश्चित तत्त्वावर आधारलेले नसावे अशी शंका येते. आता हे वर्गीकरण 'अर्था'च्या दृष्टीने करता येणे शक्य आहे की काय ते पाहू.

प्रथमतः कोणताही एका वर्गाचा घटक दुसऱ्या वर्गाचा घटक असू शकत नाही हे लक्षात घेऊन, 'कोण' 'काय' ही प्रश्नार्थक व अनिश्चित या दोन्ही वर्गांत असणारी फक्त दोनच सर्वनामे आहेत हे पाहता, त्यांचा एकच वर्ग करता येणे शक्य आहे काय याचा विचार केला पाहिजे. 'कोण' व 'काय' ही सर्वनामे जेव्हा प्रश्नार्थक असतात तेव्हा प्रश्नवाक्यात येतात व जेव्हा अनिश्चित असतात तेव्हा विधानवाक्यात येतात. जरा अधिक विचार केला तर असे दिसेल की, प्रश्नवाक्यात जेव्हा 'कोण' व 'काय' येतात तेव्हाही व्यक्तीची अनिश्चितताच अभिप्रेत असते. 'हे काम कोणी केले?' असा प्रश्न विचारला जातो तेव्हा 'कोणी' या शब्दाने कोणत्याही निश्चित व्यक्तीचा बोध होत नाही. तसेच 'तू काय खाल्लेस?' या प्रश्नातही 'काय' या शब्दाने खाल्ल्या गेलेल्या निश्चित वस्तूचा बोध होत नाही. यावरून 'कोण' व 'काय' ही सर्वनामे 'अनिश्चितार्थक'[७] मानण्यास हरकत नाही. आता तपासण्याचा आणखी एक मुद्दा राहिला तो म्हणजे 'कोण' व 'काय' या शब्दांच्या योजनेनेच केवळ प्रश्नाची अर्थनिष्पत्ती होते काय? याही प्रश्नाचे उत्तर पुढील वाक्यांच्या उच्चारणांची परस्पर तुलना केल्यास स्पष्ट होईल.

(१) हे रामाने केले.
(२) हे रामाने केले?
(३) असे कोणी करत नाही.
(४) असे कोणी करत नाही?
(५) हे रामा करत नाही.
(६) हे रामा करत नाही?

वाक्यक्रमांक (१) व (२) आणि (३) व (४) पडताळून पाहिल्यास असे दिसेल की, त्यांमधील शब्दयोजना व त्या शब्दांची स्थानयोजना एकच असून फक्त उच्चारणपद्धती भिन्न आहे. तसेच वाक्य (४) व (६) मधील उच्चारणपद्धती प्रश्न विचारणाराच्या समान मनोभावामध्ये समान आहे. तसेच 'हे कोणी केले' हे वाक्य, वाक्यक्रमांक (१) प्रमाणे उच्चारले तर या वाक्यात 'कोणी' शब्द असूनही प्रश्न वाटत नाही. परंतु कोणी शब्दाने या वाक्यात समाधानकारक अर्थ प्राप्त होत नसल्याने फारसे ते प्रचारात नाही इतकेच. तात्पर्य, 'कोणी' व 'काय' या शब्दांत मूलतः प्रश्नाचा अर्थ नाही म्हणून प्रश्नार्थक व अनिश्चित हे दोन्ही वर्ग एकत्र करून त्यांना 'अनिश्चितार्थक' म्हणण्यास हरकत नाही.

'कोण' व 'काय' यांचे जे इतर उपयोग आहेत, उदा. विलक्षणपणा[८], आश्चर्य दाखवणे, इत्यादी संबंधांत दोन उत्तरे देता येणे शक्य आहे. 'कोण' हे नामामागे आल्यास विशेषण मानावे व स्वतंत्र आल्यास सर्वनाम मानावे. म्हणजेच 'कोण'चे दोन उपयोग आहेत–एक ते सर्वनाम आहे व दुसरे ते स्थानिक विशेषण आहे. किंवा 'कोण' व 'काय' ही सर्वनामे 'कोण' व 'काय' या विशेषणांशी जरी उच्चारसाम्यता दाखवीत असली तरी ती त्यापासून भिन्न आहेत.

आता दर्शक व संबंधी सर्वनामांबद्दल पाहू. ही सर्वनामे जेव्हा नामांबरोबर येतात तेव्हा विशेषणांप्रमाणे वागतात, व स्वतंत्र येतात तेव्हा ('तो' वगळून) नाम अध्याहृत घेऊन येतात. 'तो' वगळून असे म्हणण्याचे कारण 'तो' दर्शक व तो 'तो' तृ. पु. ए. व. यांच्यात उच्चारसाम्यता असल्याने 'तो' हे दर्शक सर्वनाम नामाबरोबर आले व 'तो' हे दर्शक सर्वनाम अध्याहृत असता आले असा फरक करणे अवघड आहे. दर्शक व संबंधी सर्वनामे योजून पुढे काही वाक्ये दिली आहेत :—

(१) जो मुलगा हसतो तो शहाणा आहे.
(२) जो — हसतो तो शहाणा आहे.
(३) हा मुलगा हसतो. हा शहाणा आहे.
(४) हा — हसतो.
(५) जो मी येतो तो तुझ्याकरता येतो.
(६) हा मी येतो हा तुझ्याकरता येतो.

वरील वाक्ये तपासल्यावर असे दिसते की, पहिल्या वाक्यातील 'तो' दर्शक नसून तृतीय पुरुष एकवचनी आहे.

---

७. प्रश्नार्थक असतानाही ती अनिश्चितार्थकच असतात.

८. पृ. ११८.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तसेच 'जो मुलगा हसतो' हे त्याचे विशेषणवाक्य आहे. तसेच वाक्य (२) मधील 'जो' व वाक्य (४) मधील 'हा' यांना मागील अनुसंबंधी अथवा पूर्वनामाशिवाय अस्तित्व शक्य नाही. एखादा मनुष्य येताना पाहून 'हा आला' असे विधान केले जाते तेव्हा त्यात 'मनुष्य' शब्द अध्याहृत नसेल तर त्या विधानाला अर्थच राहणार नाही. यावर अशी शंका घेता येईल की, सर्वच सर्वनामे अनुसंबंधी अथवा पूर्वनामाशिवाय येत नाहीत. परंतु प्रथम, द्वितीय व तृतीय पुरुषवाचक[9] सर्वनामे आणि दर्शक व संबंधी या सर्वनामांच्या उपयोगात पुढील फरक प्रामुख्याने दिसतो.

(१) जो मुलगा आला. (३) तू आलास.

(२) हा मुलगा आला. (४) मी आलो.

या चार वाक्यांतील क्रमांक (१) मधील " जो " व (२) मधील " हा " नंतरचा " मुलगा " शब्द गाळता येतो. याचाच अर्थ या सर्वनामानंतर नाम येईल अगर येणार नाही, परंतु वाक्यक्रमांक (३) व (४) मधील " तू " व " मी " नंतर " मुलगा " या शब्दाचा उपयोग होत नाही. " मी " व " तू " नंतर नाम येण्याची वाक्यरचनेची प्रवृत्ती नाही व जरी कदाचित नाम आलेच तर ते विशेषनिदर्शक[10] म्हणूनच येताना आढळते. उदाहरणार्थ " मी राजा, आज्ञेय " किंवा " मी बाई माणूस काय करू शकणार ? " येथे " जो " व " हा " नंतर येणाऱ्या नामात व " मी " व " तू " नंतर येणाऱ्या नामात वाक्याचे अर्थाच्या दृष्टीनेच मूलतः फरक आहे. " जो " व " हा " ने नामाची व्याप्ती मर्यादित केली असली तरी " मी " व " तू " नंतर येणाऱ्या नामाने नामाची व्याप्ती मर्यादित न करता नामातील विशेषत्व नजरेस आणून दिले आहे. हे सर्व लक्षात घेता दर्शक व संबंधी सर्वनामांना सर्वनामाच्या वर्गात न घालता विशेषणांच्या वर्गातच घालणे अधिक योग्य दिसते. पुढील नाम गाळून ज्याप्रकारे " आंधळ्या "-सारखे विशेषण स्थानिक नाम म्हणून येऊ शकते त्याच प्रकारे " जो " व " हा "[11] याचा उपयोग होईल. दर्शक व संबंधी सर्वनामांना सर्वनामांच्या यादीतून गाळल्यावर सर्वनामांची संख्या सातच[12] ठरेल व तिचे अर्थदृष्ट्या पुढील वर्गीकरण उपयुक्त ठरेल असे वाटते.

सर्वनामे
- व्याप्ती, वस्तू अथवा नामत्व[13]/निदर्शक अथवा/वाचक[13]–मी, तू, तो.
- आत्मवाचक–आपण, स्वतः.
- अनिश्चितार्थक–कोण, काय.

येथपर्यंत सर्वनामाच्या वर्गीकरणाबद्दल पाहिले. आता विशेषणाच्या एका विशिष्ट प्रकाराबद्दल पाहू. सर्वनामे[14] विभक्त्यन्त शब्दापूर्वी जेव्हा सामान्यरूप घेऊन येतात तेव्हा त्यांना सार्वनामिक मूलविशेषणे अथवा सर्वनामविशेषणे म्हणावे अशा अर्थाचे विधान केले आहे. या संबंधात येथे " मज गरिबाला ", " आम्हा अडाण्यांनी," " तुम्हा श्रीमंतांना " यांसारख्या प्रयोगातील " मज ", " आम्हा ", " तुम्हा " यासारख्यांचा विचार करावयाचा आहे.[15] पुरुषवाचक (=व्यक्तिवाचक किंवा नामत्ववाचक) सर्वनामे ज्याप्रमाणे फक्त सामान्यरूपाने वरील ठिकाणी आलेली दिसतात त्याचप्रमाणे कधी कधी नामेही फक्त सामान्यरूपाने आलेली भासतात.

" हे कुणी कुणा सांगावे
आईच्या वाळा ठावे
प्रेमाच्या गावा जावे.

मग ऐकावे या बोला ॥ राजहंस माझा निजला ॥ "

या सुप्रसिद्ध अवतरणातील " वाळा ", " गावा ", " बोला " हे शब्द विभक्तीने युक्त आहेत की नाहीत ! असल्यास कोणत्या विभक्तीत आहेत ? " जावे क्रियापद

---

९. तो हे जेव्हा पुरुषवाचकाप्रमाणे म्हणजेच व्यक्तिवाचकाप्रमाणे असते तेव्हा. १०. नामातील विशेषत्वाचे निदर्शक.

११. विवेचनाच्या सुलभतेसाठी " तो " दर्शक विवेचनातून गाळले होते, परंतु " जो " व " हा " ची सर्व विधाने दर्शक " तो " ला लागू आहेत असे समजावे.

१२. " आम्ही ", " तुम्ही " इत्यादी सर्वनामांची व्यवस्था काय करावी तसेच सर्वनामांची संख्या काय असावी हा स्वतंत्र चर्चेचा विषय असल्याने फक्त श्री. दामले यांचीच संख्या लक्षात घेतली आहे.

१३. यांपैकी कोणताही शब्द घ्यावा. १४. पृ. १३४, १४०. १५. दर्शक व संबंधी सर्वनामांची चर्चा मागे झालीच आहे

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

अकर्मक असल्याने "गावा" ही "गाव"ची द्वितीया होणार नसली तरी व ते "—आ" प्रत्ययान्त क्रियाविशेषण आहे असे सिद्ध करता येणार असले तरी "बाळा" व "बोला" ही अनुक्रमे "ठावे" व ऐकावे" यांची कर्मेच आहेत. ती "बाळाला" व "बोलांना" या रूढ प्रयोगाऐवजी आलेली आहेत. नामाची सामान्यरूपे विभक्तिप्रत्ययाशिवाय येण्याची मराठी नामांची सामान्यरूपे येथे या रूपांना (सामान्यरूप + शून्य प्रत्यय, म्हणजेच ज्या प्रत्ययाचा उच्चार लुप्त आहे असा प्रत्यय, अशा प्रकारे) प्रत्ययाने युक्तच मानावे लागेल. अशा प्रकारची लुप्त-प्रत्यय विभक्तीने युक्त रूपे बहुशः काव्यातच येत आहेत म्हणून ती क्वचित दिसणारी समजली तरी ती नामांची एक प्रवृत्ती आहे असे लक्षात घेऊन नामाप्रमाणे वागणाऱ्या सर्वनामांचीसुद्धा "आम्हा", "तुम्हा" अशी रूपे होणे ही्ही एक क्वचित आढळणारी प्रवृत्ती आहे असे समजण्यास हरकत नाही. याच कारणाने त्यांना "मला गरिबाला" पृ. १३८ यातील "मला" प्रमाणे समजून सार्वनामिक विशेषणातील सार्वनामिक मूलविशेषणे अथवा सर्वनाम विशेषणे हा एक उपवर्ग मानण्याचे कारण नाही. तसेच सर्वनाम विशेषणांना सार्वनामिक विशेषणाचा एक उपवर्ग मानू नये याचे आणखीही एक कारण वरील विधानाला पुष्ट्यर्थकच आहे. ते म्हणजे या विशेषणांचे इतर विशेषणाचेपेक्षा असणारे भिन्न वर्तन होय. या विशेषणांखेरीज सर्व विशेषणे अधि व विधिविशेषणे म्हणून येऊ शकतात हे होय. पृ. १३४. यावरून असे दिसेल की, विशेषणांचा सार्वनामिक मूल विशेषणे अथवा सर्वनामविशेषणे असा उपवर्ग करण्याची आवश्यकता नाही.

* * *

कै. शि. म. परांजपे

# 'अधिक' शब्द अधिक

सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यं
मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति।
इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम्॥

शाकुंतल नाटकाच्या पहिल्या अंकातील या सुंदर आणि सुप्रसिद्ध श्लोकामध्ये शकुंतला वल्कल नेसली असतानाही सुशोभित दिसत होती, अशाबद्दलचे प्रतिवस्तूपमा, अर्थान्तरन्यास वगैरे अलंकारांच्या साहाय्याने कालिदासाने फार मनोवेधक वर्णन केले आहे. कालिदासाच्या अनेक चांगल्या श्लोकांपैकी हा एक श्लोक आहे. असल्या चांगल्या श्लोकामधील चांगलेपणा जितका चांगला होणे शक्य असेल तितका तो असणे, हे सहृदयतेच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. सात मऊ गाद्यांच्या खालच्या तळाच्या एका गादीमध्ये चुकून कोठे एक जाड केस कापसामध्ये मिसळून गेलेलाही एका नाजुक मर्मज्ञ मनुष्याला खपला नाही, अशी एक लौकिक व्यवहारातील विनोदी गोष्ट कोणी विनोदी लोक सांगत असतात.

त्याचप्रमाणे एखाद्या सुंदर काव्यामध्ये कोठे एखादा लहानसा दोष असला, तर तोही सहृदयतेला सहसा सहन होत नाही. म्हणून वरील श्लोकाच्या तिसऱ्या चरणातील 'अधिक' शब्दाच्या अधिकपणाबद्दल केलेली चर्चा अस्थानी होणार नाही. हा 'अधिक' पददोष दोष म्हणून दाखविण्याइतका कोण रसज्ञ मनुष्य कृतघ्न होऊ शकणार आहे! म्हणून यात दोषाविष्करणाचा हेतू नसून निसर्गमधुर काव्यसुधा जास्त मधुर करण्याचा हा एक नम्र प्रयत्न आहे.

प्रतिवस्तूपमा या अलंकारातील आत्मा म्हटले म्हणजे हा होय की, उपमेय आणि उपमान यांच्यामधील सामान्य धर्म भिन्न शब्दांनी व्यक्त केला गेलेला असला, तरी तो एकच स्वरूपाचा असला पाहिजे. वरील श्लोकाच्या पूर्वीचे जे अवतरण आहे, ते अशा प्रकारचे आहे :

'काममननुरूपमस्या वयसो वल्कलम्।
न पुनरलंकारश्रियं न पुष्यति।'

यात असे म्हटले आहे की, शकुंतलेच्या तरुण वयाच्या दृष्टीने पाहता तिला वल्कल हे अयोग्य आहे. तरी पण त्या वल्कलानेही तिच्या सौंदर्याचा परिपोषच होत आहे आणि या विधानाच्या प्रतिपादनासाठी पुढील श्लोकामध्ये एक शैवलाने झाकलेल्या कमलाचे आणि दुसरे कलंकाने युक्त असलेल्या चंद्राचे उपमानात्मक उदाहरण प्रतिवस्तूपमेच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

दृष्टीने दिलेले आहे. या तीन ठिकाणांपैकी कोणत्याही ठिकाणी अधिकपणाची अगर तारतम्याची (comparison ची) कल्पना नाही. असे असता याच्यापुढील तिसऱ्या चरणामध्ये एकदम 'अधिकमनोज्ञा' असे पद आले आहे. परंतु त्यात 'अधिक' हा शब्द का व कोठून यावा?

'न पुनरलंकारश्रियं न पुष्यति' यात अधिकपणाची कल्पना नाही. शैवलाने अनुविद्ध झालेले सरसिज अधिक रम्य दिसते, असे श्लोकाच्या पहिल्या चरणात म्हटलेले नाही किंवा हिमांशूवरील मलिन कलंक त्याचे सौंदर्य अधिक वाढवितो, असा दुसऱ्या चरणातील वर्णनाचाही कटाक्ष नाही. मग एकदम तिसऱ्या चरणातच ही तन्वी वल्कलाने मनोज्ञ दिसते, असेच म्हणणे ओघाने प्राप्त होत असता व तेवढेच पुरेसेही होत असता ही तन्वी वल्कलाने अधिक मनोज्ञ दिसते, अशा प्रकारचे अनवश्यक असे अधिक वर्णन का करण्यात आले? चतुर्थ चरणातील अर्थांतरन्यासामध्येही अधिक मंडनाची कल्पना नसून नुसत्या साध्या अविशिष्ट मंडनाचाच उल्लेख आहे.

बरे, तिसऱ्या चरणातील अधिक मनोज्ञपणाचे वर्णन हेच जर वस्तुस्थितीला धरून खरे होय, असे मानावयाचे असेल, तर ह्या अधिक मनोज्ञपणापाशी जमण्याकरिता पहिल्या चरणात शैवलाने झाकलेले कमळ अधिक रम्य दिसते आणि कलंकाने युक्त असलेला चंद्र अधिक शोभिवंत दिसतो, असे वर्णन पहिल्या दोन चरणांमध्ये असावयाला पाहिजे होते. म्हणजे वस्तू आणि प्रतिवस्तू यांच्यामधील बिंबप्रतिबिंबभाव बरोबर जमला असता. परंतु तसे अधिकपणाचे वर्णन पहिल्या दोन चरणांत नाही. म्हणूनही तिसऱ्या चरणातील 'अधिक' पदाचा प्रयोग सदोष होतो.

शिवाय, 'अधिकमनोज्ञा' यातील अधिक या पदाने प्रदर्शित केलेली तुलना कोणत्या दोन अवस्थांमधील आहे? दुसरे एखादे वस्त्र नेसण्यापेक्षा वल्कल नेसलेल्या स्थितीमध्ये शकुंतला जास्त मनोज्ञ दिसत होती, असे मानावे, तर दुष्यंताने शकुंतलेला दुसरे एखादे वस्त्र नेसलेल्या अवस्थेमध्ये यापूर्वी केव्हा पाहिले होते? तो तर तिला या वल्कलावृत स्थितीमध्येच या वेळी पहिल्यानेच पाहात असल्यामुळे मनोज्ञपणातील तुलनेची आणि तारतम्याची कल्पना मुळीच जमण्यासारखी नाही.

या सगळ्या परीक्षणावरून तिसऱ्या चरणातील 'अधिक' हा शब्द अधिक का व कसा होतो, हे कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे. 'इयमपि च मनोज्ञा वल्कलेनापि तन्वी' असा एक पाठभेद आहे. या पाठभेदाने अधिक पदाचा दोष नाहीसा होतो.

---

स्वराज्य (पुणे) १ मार्च १९२३ च्या अंकातील लेख—पुनर्मुद्रित.

* * *

(ले.—एक समालोचक)

# 'स्वराज्य'कर्त्यांचा जावईशोध

सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यम् ।
मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।
इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी ।
किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम् ॥ १ ॥

हा एक कविकुलगुरू कालिदासाच्या सुप्रसिद्ध शाकुन्तल नाटकाच्या पहिल्या अंकातील श्लोक आहे. शाकुन्तल नाटकामध्ये रसिकजनचित्तवेधक म्हणून जे काय दहापाच उत्तमोत्तम श्लोक आहेत, त्यांमध्येच काव्यमर्मज्ञ या श्लोकाची गणना करीत आले आहेत. या श्लोकामध्ये एखादा दोष असेल व तो सहृदयतेला असह्य होईल अशी कोणाची आजवर समजूत नव्हती. पण, पुणे येथे प्रसिद्ध होणाऱ्या 'स्वराज्य' साप्ताहिकाच्या ता. १ मार्चच्या अंकात श्रीयुत शिवरामपंत परांजपे यांनी या श्लोकामध्ये एक अधिक शब्द अधिक झाला असून त्यामुळे काव्यसुधा किंचित कटू भासते, करिता तो शब्द काढून टाकावा म्हणजे ती निसर्गमधुर काव्यसुधा जास्त मधुर होईल अशी सूचना केली आहे.

श्री. शिवरामपंत हे आपल्या महाराष्ट्रामध्ये अत्यंत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

रसिक काव्यमर्मज्ञ व विद्वान म्हणून नाणावलेले आहेत. यांनी पूर्वी काही काल एका कॉलेजमध्ये प्रोफेसरीचेही काम केलेले आहे. तेव्हा अशा बड्या प्रस्थांकडून पुढे आलेली सूचना ही अवश्य विचारणीय असणारच. करिता या सूचनेसंबंधी आम्ही आपले विचार चिकित्सक वाचकांपुढे सादर करीत आहो.

प्रो. मजकुरांनी अधिक शब्दाला काढून लावण्यासंबंधी जी कारणे दिली आहेत, त्यांपैकी पहिले कारण असे की, या श्लोकामध्ये कवीने प्रतिवस्तूपमा नावाचा अलंकार साधला आहे. या अलंकारामध्ये सामान्यधर्म भिन्न शब्दांनी जरी व्यक्त केलेला असतो, तथापि तो एकच असावयास पाहिजे ही मुख्य गोष्ट आहे. प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या चरणामध्ये शैवलाने अनुविद्ध झालेले सरसिज अधिक रम्य दिसते असे म्हटलेले नाही. त्याचप्रमाणे हिमांशूवरील मलिन कलंक त्याचे सौंदर्य अधिक वाढवितो असाही दुसऱ्या चरणातील वर्णनाचा कटाक्ष नाही. मग तिसऱ्या चरणामध्येच ही तन्वी वल्कलाने अधिक मनोज्ञ दिसते, अशा प्रकारचे अनवश्यक वर्णन का करण्यात आले? प्रतिवस्तूपमा अलंकारामध्ये उपमान व उपमेयवाक्यातील समान धर्म एकच स्वरूपाचा असावयास पाहिजे. त्यामध्ये न्यूनाधिक्य काही असता कामा नये. या श्लोकातील प्रथम दोन चरणांमध्ये जर अधिकपणाचे वर्णन नाही तर तिसऱ्या चरणामध्ये आधिक्य कशास वर्णावयास पाहिजे? अर्थात तिसऱ्या चरणातील "अधिक" शब्दाचा प्रयोग सदोष आहे.

दुसरे कारण असे की, या श्लोकामध्ये 'अधिक' या शब्दाने तुलना प्रदर्शित केली आहे, पण तुलना करावयाची तर दोन अवस्था दाखवावयास पाहिजेत. शकुन्तला वल्कल नेसल्याने जर जास्त मनोज्ञ दिसते तर दुसऱ्या कोणत्या वस्त्राने ती कमी मनोज्ञ दिसत होती? या ठिकाणी शकुन्तला ही दुष्यन्त राजाच्या नजरेला प्रथमच पडली असल्याने तुलना करण्यासारख्या दोन अवस्थाच त्यास माहीत नाहीत. करिता तुलनेचा अर्थ दाखविणारा या श्लोकातील 'अधिक' शब्दाचा प्रयोग सदोष आहे. करिता हा दोष काढून टाकण्यासाठी 'इयमपि च मनोज्ञा वल्कलेनापि तन्वी' असा एक पाठभेद आहे, तो स्वीकारला म्हणजे हा अधिक पदाचा दोष नाहीसा होतो.

आमच्या समजुतीने या ठिकाणी अधिक हा शब्द अधिक नाही. उलट तो योग्य प्रसंगी मोठ्या चातुर्याने कवीने योजिला असल्याने त्यायोगे कवीचे काव्यनिर्माणकौशल्य अधिकच व्यक्त होते. आमचे हे विधान खालील विवेचनावरून वाचकांच्या लक्षात चांगले येईल.

या श्लोकाचा पूर्वसंबंध पाहिला असता असे दिसून येते की, 'कामं अननुरूपं अस्याः वयसो वल्कलं न पुनरलंकारश्रियं न पुष्यति' म्हणजे शकुन्तलेच्या वयाला वल्कल हे जरी अत्यंत अयोग्य आहे, तथापि अलंकार धारण केले असता जसा सौंदर्याचा परिपोष होतो तसाच या वल्कलानेही होत आहे. असे विधान कवीने प्रथम करून नंतर त्याची सिद्धी करण्यासाठी प्रस्तुत श्लोकाची रचना केलेली आहे. श्लोकाच्या या पूर्वसंबद्ध वाक्यातील 'पुष्यति' म्हणजे वाढविते या क्रियापदाकडे नजर दिली असता श्लोकाच्या आरंभापासूनच आधिक्याची कल्पना कवीने येथे नमूद करून ठेविली आहे हे दिसून येईल. ही आधिक्याची कल्पना अधिक स्पष्ट करून दाखविण्यासारखेच पुढील श्लोकातील वाक्यरचनेचे धोरण कवीने ठेविले आहे. या श्लोकामध्ये प्रतिवस्तूपमा अलंकार आहे ही गोष्ट सर्वमान्य आहे. परंतु या अलंकारामध्येही कवीने येथे व्यतिरेक अलंकाराचे व्यङ्ग्यार्थाने मिश्रण करून अधिकच चमत्कृती निर्माण केली आहे.

'सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यं।' कमळ हे शेवाळाने जरी व्याप्त झाले तथापि ते रम्य दिसते. या एका उपमानवाक्यानेच येथे प्रतिवस्तूपमा अलंकाराची पूर्तता होत आहे. असे असताना दुसऱ्या चरणामध्ये "चंद्राचा मलिन कलंक त्याची शोभा अधिक वाढवितो" (मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति) असे दुसरे आणखी एक उपमानवाक्य कशास घातले? एका उपमेयवाक्याचे समर्थन करण्यासाठी जर अनेक उपमानवाक्यांचे प्रथन श्लोकामध्ये कवीने केलेले असेल तर त्या ठिकाणी मालाप्रतिवस्तूपमा अलंकार मानतात. पण तसा मालारूपही येथे मानता येत नाही. याचे कारण, या प्रतिवस्तूपमा अलंकारातील जीवरूप गोष्ट जी सामान्य धर्माचे ऐक्य ते या दोन उपमावाक्यांमध्ये दिसून येत नाही. पहिल्या वाक्यामध्ये शैवालव्याप्त सरसिज हे रम्य असते, अशी केवळ अविशिष्ट रम्यताच कमळाची दाखविली आहे. पण दुसऱ्या चरणामध्ये चंद्राचा कलंक त्याची शोभा वाढवीत आहे. "लक्ष्मीं तनोति, शोभां विस्तारयति" याप्रमाणे सौंदर्याधिक्याची कल्पना स्पष्ट करणाऱ्या शब्दाचा प्रयोग करून

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उपमानाचा उत्कर्ष दाखविला आहे. तात्पर्य, पहिल्या दोन वाक्यांतील दोन उपमानवाक्यांमध्ये सामान्य धर्माचे प्रमाणतः ऐक्य नसल्याने मालाप्रतिवस्तूपमा अलंकार या श्लोकामध्ये संभवत नाही. तसेच साधाही प्रतिवस्तूपमा अलंकार आपल्या अत्यंत शुद्ध स्वरूपात या ठिकाणी कवीने दाखविलेला नाही. तर त्यानेही काव्याला उत्तमत्व येण्यासाठी व्यतिरेक अलंकाराचे ध्वनिरूप मिश्रण केलेले आहे. उपमानापेक्षा उपमेयाचा उत्कर्ष जेथे वर्णिला असतो तेथे व्यतिरेक अलंकार होतो. " शकुन्तलेच्या तरुण वयाच्या दृष्टीने पाहता वल्कल जरी तिला अयोग्य आहे तरी पण त्या वल्कलानेही तिच्या सौंदर्याचा परिपोषच होत आहे. " या श्लोकावतरणरूप वाक्यामध्ये अधिकाच्या कल्पनेला " पुष्यति " या शब्दप्रयोगाने कवीने जी एकदा सुरुवात केली तिचा श्लोकातील प्रथम दोन उपमानवाक्यामध्ये तर अत्यंतच कळस केला. हे प्रथम वाक्यामध्ये " रम्य " दुसऱ्या वाक्यामध्ये " लक्ष्मीं तनोति " हे तिसऱ्या वाक्यामध्ये " अधिकमनोज्ञा " याप्रमाणे बुद्धिपुरस्सर कवीने केलेल्या शब्द-प्रयोगावरून रसिक वाचकांच्या ध्यानी येईलच.

श्लोकातील प्रथम तीन चरणांमध्ये उद्धृत केलेल्या इतक्या स्पष्ट शब्दांनी अधिकपणाची कल्पना तारतम्याने कवीने ग्रथित करून ठेविली असता, प्रोफेसरसाहेब ती कल्पना या श्लोकामध्ये कोणत्याही ठिकाणी नाही असे उघड विधान करतात ते कशाच्या आधारावर, हे त्यांचे त्यांसच माहीत. आम्हास तरी त्याचा उलगडा होत नाही. आता व्यतिरेक अलंकाराचा ध्वनी या श्लोकामधून असा निघतो की, प्रथम चरणामध्ये कमल हे उपमान घेतले असून दुसऱ्या चरणामध्ये चंद्र हे उपमान घेतले आहे. वर्ण्यविषयाची कल्पना वाचकाच्या मनामध्ये उतरविण्यासाठी कविजनांना उपमानाची योजना वाक्यामध्ये करावी लागते. एका उपमानाने तो कार्यभाग पुरा होत असता पुनः दुसरे उपमान सांगण्याची आवश्यकता काय? जरुरी नसताना अकारण शब्दांची किंवा वाक्यांची अधिक केलेली योजना ही सदोष होते. महाकवींच्या वाक्यातून तरी असले दोष असता कामा नयेत; विशेषतः कविकुलगुरुच्या काव्यात तर बिलकुलच असता कामा नयेत. मग असे असता या प्रस्तुत श्लोकामध्ये दोन उपमाने कशाकरिता ? आमच्या कल्पनेने त्यास पुढीलप्रमाणे उत्तर आहे.

शकुन्तला ही वल्कलाने जरी आवृत आहे तथापि ती अधिकच सुंदर दिसते, या आपल्या विधानाच्या प्रतिपादनासाठी कवीने प्रथम शैवलानुविद्ध कमलाचे उपमान घेतले पण त्यायोगे कवीचे समाधान झाले नाही. कारण कमल हे जरी रम्य असले तरी त्याचा तो रम्यपणा ते विकसित आहे तोपर्यंतच असणार. कमलाचा विकास हा धर्म काही अखंड राहणारा नव्हे. तो सूर्यविकासी कमलांचा सूर्य अस्तपर्यंतच असणार. सूर्यास्तानंतर कमलाचे म्लान होऊन रम्यता निघून जाणार, तेव्हा अशा तऱ्हेचा दृष्टान्त अपूर्ण आहे; रात्रीच्या वेळी या कमलाला रम्यता नाही म्हणून कवीने दुसरे उपमान, रात्रीच्या वेळी ज्याच्या ठिकाणी अधिक सौंदर्य उत्पन्न होते अशा चंद्राचे घेतले आहे. पण त्यामध्येही पुनः कमीपणा कायमच राहिला. चंद्र हा निशासमयी जरी कलंकांकित असा अधिक सुशोभित दिसतो तरी तसा तो दिवसा मुळीच दिसत नाही.

आणि शकुन्तला ही रात्र असो वा दिवस असो या दोन्ही कालांमध्ये सुंदरच दिसते. अर्थात उपमान म्हणून जे दोन पदार्थ उपयोगात आणिले त्यापेक्षाही उपमेयभूत शकुन्तलेमध्ये अधिक गुण दृष्टीस पडल्याने ती त्या दोन पदार्थांपेक्षा तारतम्याच्या दृष्टीने अधिक सुंदर आहे हे दाखविण्यासाठी, तिसऱ्या चरणामध्ये शकुन्तलेला " अधिक मनोज्ञा " हे विशेषण उपयोजून व्यतिरेक अलंकाराची छटा कवीने निर्माण केली आहे आणि आपल्या निसर्गमधुर काव्यसुधेत अधिकच माधुरी आणली आहे. तात्पर्य, ज्या " अधिक " या पदाने श्लोकाच्या उपक्रमामध्ये उत्पन्न झालेल्या अधिकपणाला कायम ठेवून काव्यदेवतेच्या सौंदर्यवर्धनार्थ एका अधिक अलंकाराची बहारीची जोड तिला करून दिली, त्याच " अधिक " शब्दाला अधिक म्हणून दोषात काढणे आणि तो दूर करून " इयमपि च मनोज्ञा वल्कलेनापि तन्वी " असे नीरस व अर्थशून्य पाठान्तर सुचविणे म्हणजे आम्हांस शिरोभागी म्हटल्याप्रमाणे " जावईशोधा "चे वाटते. आवश्यक, अर्थपरिपूर्ण व भूषणप्रद असा अधिक शब्द काढून त्या ठिकाणी अपि आणि च हे दोन शब्द घातल्याने कोणता अर्थपरिपोष होतो व रसवत्ता अधिक वाढते याचा विचार वाचकांनीच आपल्याशी करावा. शिवाय असे पाठान्तर खरोखर असते तर त्याचाही थोडा विचार करावा लागला असता, पण यासंबंधी शोध करून ४१२ निरनिराळ्या प्रती आम्ही पाहिल्या, परंतु कोणत्याच प्रतीत हे पंतांनी सुचविलेले पाठान्तर आमच्या नजरेस आले नाही.

---

' प्रबोध ' ( धुळे २५ मार्च १९२३ च्या अंकातील लेख पुनर्मुद्रित – लेखक श्री. बाळाचार्य सुपेरकर )

* * *

---

( वरील दोन्ही पुनर्मुद्रित लेख आचार्य लिमये व प्रा. मंगरूळकर यांच्या प्रयत्नाने देण्यात आले आहेत. )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचनाचे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्य-समीक्षा

## मुर्दाड

'मुर्दाड' हा प्रा. भीमराव कुलकर्णी यांचा पहिलाच कथासंग्रह असून त्यात त्यांच्या चौदा कथा समाविष्ट करण्यात आल्या आहेत. भीमराव कुलकर्णी यांचा हा पहिलाच कथासंग्रह असला तरी यातील कथा इतक्या ठसठशीत, किंबहुना ठसकेबाज आणि डोळ्यांत भरण्यासारख्या आहेत की, नवखेपणाचा यत्किंचितही मागमूस त्या वाचताना कुठे जाणवत नाही, पण भीमरावांच्या कथेचा वेगळेपणा मात्र निःसंशय जाणवतो. नव्या किंवा जुन्या कथेच्या तथाकथित ठराविक चौकटीत भीमराव कुलकर्णी यांची कथा कुठेच बसत नाही. नव्या–जुन्या कुठल्याच कथेच्या दावणीला बांधता येणार नाहीत, इतक्या 'मुर्दाड' मधील कथा आडदांड आहेत, अवखळ आहेत.

'मुर्दाड' मधील कथांचे विश्व हे महाराष्ट्र–कर्नाटक यांच्या सीमेभोवती सीमित झालेले आहे. हे जग लेखकाने ढळढळीतपणे पाहिले आहे, प्रामाणिकपणे या लहानशा जगाचा अनुभव त्याने घेतलेला आहे आणि नंतर त्याविषयी दणकटपणे लिहिले आहे. म्हणूनच लेखकाच्या निवेदनात विलक्षण प्रामाणिकपणा आहे आणि या प्रामाणिकपणातून जन्मलेला भक्कम आत्मविश्वास सर्व कथांतून जाणवतो. या कथांना शैलीचे भर्जरी किंवा तलम लेणे नाही, तपशीलाचा सोस नाही आणि कथानकाचा हव्यासही नाही. सरळसोट निवेदनातून उभी राहतात, ती फक्त ठसठशीत, जिवंत, भरदार माणसे, आणि ही माणसे फार काळ लक्षात राहतात. भीमराव कुलकर्णी यांनी सीमाभागातले जग जवळून पाहिले, पण त्यांनी कथांमध्ये टिपली ती त्या भागातली रसरशीत माणसे, त्या विशिष्ट प्रदेशाचेच चित्र भरगच्च तपशिलांसह रेखाटण्याच्या भरीस ते पडले नाहीत. त्यामुळे विशिष्ट प्रदेशातील माणसे या कथात वावरत असूनही त्यांना प्रादेशिकतेचा वास येत नाही.

भीमरावांची कथा ही व्यक्तिप्रधान आहे. कथा व्यक्तीभोवती घोटाळते आणि या व्यक्ती चित्रांसारख्या डोळ्यासमोर येतात. बलदंड, मग्रूर बापूला, आडव्या सुटलेल्या नंजाप्पा वाण्याला, आणि त्यानंतर अनेक बड्या धेंडांना धुळीला मिळवून शेवटी मंत्र्यांच्या बंगल्यात विराजमान झालेली 'महाराणी येसूबाय', सारे आयुष्य गावाबाहेर भुतासारखे काढून म्हातारपणी अचानक लग्न करायला निघालेला आणि बोहल्यावर जबरदस्तीने उभ्या केलेल्या वधूचा निष्पाप, कोवळा चेहरा पाहून लग्नास नकार देणारा 'मड्डीसिद्दाप्पा', निजलिंगाप्पाने आपली नखरेल बायको फितविली म्हणून निजलिंगाप्पाची शांत, गरीब बायको मागणारा आणि संसाराची रम्य स्वप्ने पाहणारा तर्कशुद्ध पण नेभळा पांडू (अदलाबदल), सात मुलगे झाले तरी मुलगी झाली नाही याबद्दल गावच्या टवाळ लोकांनी चिडविल्यावर, मुलगी व्हावी म्हणून आटापिटा करणारा आणि मुलगी झाल्यावर तिला पाहायला रातोरात बायकोच्या माहेरच्या गावाला चालत जाणारा माथेफिरू, 'अरे लेका काका'', शाळेचे तास बुडवून मारवाड्याच्या माडीवर काम करणारे आणि त्या पैशातून गरीब विद्यार्थ्यांना मदत करणारे 'गणपती-मास्तर', आपल्या जिवलग सवतीला व्यभिचारापासून मुलगा झाला आहे हा संशय चाळीस वर्षे उरात वाळवून, नंतर तो तोंडून बाहेर पडल्यावर आत्महत्या करणारी निपुत्रिक शांतव्वा (शांतलिंगाच्या दोन बायका) ही सारी माणसे सहजासहजी विसरता येण्यासारखी नाहीत. ही माणसे बेफाट आहेत आणि संयमीही आहेत. पण या साऱ्या माणसांत जिवन्तपणा आहे, एक जिद्द आहे. त्यांचे आयुष्य क्षणार्धात ढवळून टाकणारे एक तुफान आहे. अचानक लग्न करण्याची उबळ येऊन ती हट्टाने पार पाडायला निघालेला मड्डीसिद्दाप्पा काय, निजलिंगाप्पाची बायको मागण्याचा हट्ट घेऊन त्यापायी निजलिंगाप्पाकडून प्राणांतिक मार खाणारा पांडू काय, किंवा मुलगी होत नाही म्हणून बायकोचा छळ करणारा आणि संसाराचा विध्वंस करायला निघालेला हेकट काका काय, ही सारी तडफेची माणसे आहेत. विचारासरशी पेटून निघणारी, आंधळेपणे जीवाचे रान करणारी. पण ही सारी माणसे ढोबळ आहेत, त्यांच्यात बारकावे नाहीत, तरलता नाही. ती संपूर्णपणे दिसत नाहीत, त्यांच्या मनाचा एकच कोपरा झगझगीतपणे प्रकाशतो, बाकी ती माणसे गूढच राहतात.

'मुर्दाड' मधील कथांचे निवेदन सरळसोट, घवघवीत आहे. आडवीतिडवी वळणे न घेता लेखक कथेच्या गाभ्यातच शिरतो, आणि तो उलगडून वाचकांसमोर ठेवतो. 'मुर्दाड'ची शैली बहुतांश अनलंकृत असली तरी 'उकळत्या

---

—ले. भीमराव कुलकर्णी, प्रकाशक : बा. शा. इनामदार, इनामदार बंधू प्रकाशन, ९९१ सदाशिव, पुणे २, पृष्ठे १६४, मूल्य – चार रुपये.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पाण्यावर बुडबुडा यावा तशी ती हसली ' अशा चपखल प्रतिमा मधूनच सहज आढळतात. ' भीमरावांच्या कथांतून उभ्या राहतात त्या व्यक्ती, कथेतील प्रसंग, चमत्कृती यांना येथे विशेष महत्त्व नाही. थोडी चमत्कृती आढळते ती ' रंगूमावशी ' ' गणपती मास्तर ' अशा एक-दोन कथांत. बाकी या कथांची कथानकावर विशेष मदार नाही. कथेतील प्रमुख व्यक्तीच्या एखाद्या विशिष्ट पैलूवर कथा केंद्रित झालेली असते, त्या पैलूचे पोषण करणारे प्रसंग पुरेसे एकामागून एक आले की कथा संपते. ' मुर्दाड ' आणि ' शांतलिंगाच्या दोन बायका ' या दोन विशेष सरस कथा. ' मुर्दाड ' ही वेगळ्या पद्धतीने भुजंगाचे प्रतीक घेऊन काहीशा Flash-back पद्धतीने लिहिलेली, तर ' शांतलिंगाच्या दोन बायका ' ही सख्ख्या बहिणींप्रमाणे परस्परांवर प्रेम करणाऱ्या सवतींच्या उत्कट प्रेमाची हृदयस्पर्शी कथा. समर्थ कथालेखकाची बीजे उरात बाळगणाऱ्या या दोन कथा आहेत.

—राजेंद्र बनहट्टी

* * *

# हरी नारायण आपटे : व्यक्ती आणि वाङ्मय

हरिभाऊंच्या वाङ्मयाचा अभ्यास थोडयाफार प्रमाणात आजपर्यंत होत आला, तथापि त्यांच्या समग्र वाङ्मयाचा साकल्याने अभ्यास झाला असे म्हणता येणार नाही. हे झाले अभ्यासकांचे. परंतु सामान्य वाचकाकडूनही हरिभाऊंच्या समग्र वाङ्मयाचे वाचन कितपत होत असेल याची शंकाच. त्या दृष्टीने हरिभाऊंच्या सामाजिक, ऐतिहासिक कादंबऱ्यांचा, नाटकांचा, कथांचा, निबंधांचा, त्यांच्या वैयक्तिक जीवनाची तोंडओळख होण्यासाठी पत्रांचा व इतर स्फुट लेखनाचा काही अंशाने का होईना वाचकांना परिचय व्हावा ह्या हेतूने प्रेरित होऊन प्रा. हेमंत इनामदार यांनी प्रस्तुत ग्रंथ संपादित केला आहे.

संपादित ग्रंथाला पंचावन्न पानांची प्रस्तावना जोडली आहे. त्यात नवीन काही सांगण्याचा हेतू न ठेवता हरिभाऊंच्या वाङ्मयीन कार्याचे संक्षेपाने समालोचन करण्याचा प्रयत्न झालेला आहे. वाङ्मयीन कार्याचे विवेचन करण्यापूर्वी साधारणपणे पंचवीस पानांत हरिभाऊंच्या चरित्राचा भाग आलेला आहे. त्यात आजींच्या आत्यंतिक आग्रहामुळे त्यांना पुनर्विवाहाची कल्पना कशी सोडावी लागली, तसेच स्त्रीशिक्षणाचे महत्त्व समजून प्रथम पत्नीला सुशिक्षित करण्याची तळमळ, त्यांचे सामाजिक कार्य, वाङ्मयनिर्मितीच्या प्रेरणा, त्यांचे व्यक्तिमत्त्व वगैरे भाग वाचकांना हरिभाऊंची ओळख चांगल्या रीतीने करून देणारा वाटतो. तसेच हरिभाऊ नुसते पुस्तकी सुधारक नसून सुधारणेचा व समाजकार्याचा त्यांच्या जीवनात प्रत्यक्षपणे आलेला संबंध लेखकाने दाखविलेला आहे. सर्वसाधारणपणे हरिभाऊंच्या प्राथमिक अभ्यासासाठी ' साहित्यसंपदेचे सौंदर्य ', ' कथावस्तूची निवड ' ' रचना ', ' वातावरण निर्मिती ', ' भाषा आणि जीवनदृष्टी ' हा विवेचिलेला भाग उपयुक्त ठरण्यासारखा आहे.

हरिभाऊंचे वाङ्मयीन कर्तृत्व अष्टपैलू होते. त्याचे थोडक्यात दर्शन वाचकांना घडावे ह्या हेतूने उताऱ्यांची केलेली निवड योग्यच म्हणावी लागेल. ' मला पाहायला येतात ' हा ' पण लक्ष्यात कोण घेतो ! ' यातील उतारा तत्कालीन विवाहसंस्थेचे ओझरते दर्शन घडविण्याच्या व हरिभाऊंच्या वर्णनशैलीच्या दृष्टीने महत्त्वाचा वाटतो. ' अखेर व्हायचे तेच झाले ' हा ' मी ' ह्या कादंबरीतील उतारा जरठ-कुमारी विवाहाचे भयंकर दुःख व्यक्त करणारा आहे. ' गोदावरी 'च्या रूपाने तत्कालीन कनिष्ठ, मध्यम वर्गीय समाजाची दैन्यावस्था व इतर दुःखे प्रकट होतात.

ऐतिहासिक कादंबऱ्यातील उताऱ्यांविषयी हेच दिसून येईल. ' बलभीमाच्या आसनाखाली ' हा ' उषःकाल ' मधील

---

संपादक--प्रा. हेमंत इनामदार, प्रकाशक—आर्यभूषण मुद्रणालय, पुणे ४, पृष्ठे : २५६, मूल्य सहा रुपये.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उतारा अद्‌भुत रम्यतेतून वास्तवाचे दर्शन हरिभाऊ कसे घडवतात या दृष्टीने महत्त्वाचा वाटतो, तर 'लग्नाचे आमंत्रण' हा 'गड आला पण सिंह गेला' या कादंबरीतील उतारा व्यक्तिचित्रणाच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरतो. 'कुंजवनात' या वज्राघातातील उताऱ्यातून हरिभाऊंचे निसर्गवर्णन व भाषाशैली दिसून येते.

'निबंधलेखन' या सदरात संपादकाने हरिभाऊंनी लिहिलेला न्या. रानडे यांचा चरित्रवजा मृत्युलेख व कवी भूषणाचे चरित्र घातले आहे. वास्तविक हरिभाऊंनी चरित्रपर लेखन भरपूर केले आहे. तेव्हा चरित्रलेखन या स्वतंत्र सदरात वरील दोन उतारे वा अन्य चरित्रलेखन घातले असते तर उचित ठरले असते. 'निबंधलेखन' हे स्वतंत्र प्रकरण घालण्याची फारशी आवश्यकता होती असे वाटत नाही. कारण साहित्यशास्त्रीय लेखन हे निबंधातच मोडण्यासारखे आहे. दुष्काळावरील निबंध नसता तर चालले असते. इतर उताऱ्यांतून हरिभाऊंची वर्णनशैली वेळोवेळी प्रत्ययास येतेच.

हरिभाऊंचे 'पत्रात्मक वाङ्मय' विशेष महत्त्वाचे वाटते, कारण सर्वच पत्रांतून प्रेमळ, सौहार्द, आणि विशाल अंतःकरणाची ओळख पटते. 'संत सखू' आणि 'संगीत पिंगला' या दोन नाटकांतील उतारे हरिभाऊ हे नाटककारही होते हे पटवून देण्यास पुरे आहेत. तथापि रावसाहेब ढेरपोट्यांचे अश्वारोहण या नाट्यछटेतून हरिभाऊंच्या करुण, कमालीच्या सहृदय आणि संवेदनशील व्यक्तिमत्त्वाला विनोदाचाही पैलू होता याची साक्ष पटते. स्फुट गोष्टींतील 'खाशी खोड' या गोष्टीविषयी तेच म्हणता येईल. हरिभाऊंच्या काव्यलेखनातून निवडलेल्या कविता त्यांच्या अंगी असलेल्या सुप्त कवित्वशक्तीच्या निदर्शक वाटतात. 'विदग्ध वाङ्मय' व इतर साहित्यशास्त्रीय लेखांतून हरिभाऊंचा वाङ्मयविषयक दृष्टिकोण अजमावता येतो.

अशा तऱ्हेने प्रा. इनामदार यांनी हरिभाऊंच्या समग्र वाङ्मयाचे ओझरते दर्शन सर्वसामान्य वाचकांसाठी निवडक उतारे घेऊन घडविण्याचा प्रयत्न केलेला आहे. उताऱ्यांची निवड चांगलीच झालेली आहे. प्रत्येक उतारा, मग तो अवाढव्य कादंबरीतून निवडलेला का असेना स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण वाटतो. हरिभाऊंचा साकल्याने व सर्वांगीण अभ्यास लेखकाला अपेक्षित नाही हे खरेच, पण संपादित ग्रंथाच्या रचनेवरून म्हणावे तितके समाधान वाटत नाही. एकेक वाङ्मयप्रकार घेऊन त्यात हरिभाऊंची वैशिष्ट्ये दाखविली असती आणि नंतर उदाहरणादाखल उतारे घेतले असते तर सामान्य वाचकाला ते अधिक उपयुक्त ठरले असते. प्रस्तावना केवळ चरित्रपर राहिली असती. तथापि प्रा. इनामदार यांनी या संपादनकार्यातून हरिभाऊंवरील आपले प्रेम व्यक्त केले आहेच. पण हरिभाऊंच्या वाङ्मयाकडे हा संपादित ग्रंथ वाचून वाचकांनी आकर्षित व्हावे या हेतूने यथाशक्ति कामगिरी केली आहे ती उपयुक्त ठरेल यात संदेह नाही.

**प्रा. र. रा. गोसावी**

* * *

# रोमांच

जर्मन जीवनाचे काही विशेष पैलू या पुस्तकात सांगण्याचे लेखकाने योजिले आहे. पत्रकार या नात्याने लेखकाने पश्चिम जर्मनीत (विशेषतः हाम्बुर्ग या शहरी) दहा वर्षे वास्तव्य करून, दुसऱ्या महायुद्धानंतर नामोहरम झालेल्या जर्मनीने अवघ्या १०।१२ वर्षांत स्वतःची उन्नती कशी करून घेतली हे प्रत्यक्ष पाहून त्यासंबंधीची माहिती या पुस्तकात दिली आहे व त्या अनुषंगाने जर्मन जीवनाचे काही पैलू विशद करून सांगितले आहेत. हे अनुभव व माहिती विशेषेकरून पश्चिम जर्मनीसंबंधी आहे, हे वाचकांनी जरा कटाक्षाने ध्यानी धरले पाहिजे.

---

(लेखक व प्रकाशक : **व्यं. न. कुलकर्णी**, सातारा, पृष्ठे : १९६, मूल्य : ६ रुपये.)

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

